सुरसग्रंथमाला पुष्प ८८

# भिरभिरें

( कथासंग्रह. )

लेखकः—गंगाधर गाडगीळ

प्रथमावृत्ति सप्टेंबर १९५०

किंमत तीन रुपये

सु र स ग्रं थ मा ला—पंढरपूर

प्रकाशक व मालक
राजेंद्र रावजी शहा
महाद्वार, पंढरपूर
* * *

संचालक
नवजीवन गौतमचंद व्होरा
केमिस्ट, सोलापूर
* * *



मुखपृष्ठ : चित्रकार श्री. मुळगांवकर

मुद्रक
द. रा. कानेगावकर, एम्. ए.
प्रफुल्ल प्रिंटिंग प्रेस,
२५२ नारायण पेठ, पुणें २
* * *

# बलात्कार : : : १

वह्यांचा गठ्ठा तपाशीत ती बसली होती. अगदीं बारीक नजरेनें तिचें काम चाललें होतें. एके ठिकाणीं i वर टिंब नव्हतें तें तिनें दिलें; t च्या डोक्यावरची रेघ फार पुढें गेली होती तिची तिनें दुरुस्ती केली. अशा चुका असल्या म्हणजे एखाद्या बाईचा पदर ढळल्याप्रमाणें तिला वाटे आणि तो पदर नीटपणें त्या अक्षरांच्या खांद्यावर टाकल्याशिवाय तिला चैनच पडत नसे. पुढें त्या मुलीनें ' All that glitters is not gold' ( चकाकतें तें सारेंच सोनें नसतें ) अशी इंग्रजी म्हण आपल्या निबंधांत वापरली होती. अशा म्हणी तिला उतार वयाच्या आणि जबाबदार वृत्तीच्या गृहिणिसारख्या वाटत. समाधानपूर्वक तिनें आपल्या किरट्या, तिरक्या अक्षरांत त्यावर ' good ' असा शेरा दिला.

अशा म्हणींचें आणि अशा गृहिणींचें जर हें जग असतें तर तें यमुनेला फार आवडलें असतें. पण या जगांत मेले टवाळखोर पुरुष होते आणि मिजासखोर बायका होत्या. जरा कोणी अविवाहित स्त्री दिसली कीं तिच्याकडे आधाशासारखे पहायला लागायचे, आणि सरळसरळ धक्के मारायचे ते पुरुष ! रोज वर्तमानपत्रांत तरुण स्त्रीवर झालेल्या बलात्काराची एक तरी हकीकत असे. आणि अंगावर शहारे आणणारी ती हकीकत यमुना न चुकतां वाचीत असे. तिला वाटत असे कीं अंगाला सुया टोंचून टोंचून त्या पुरुषांना ठार मारावें...आणि त्या मिजासखोर बायका ! तंग कांचोळ्या आणि झिरझिरीत पोलकें घालणाऱ्या ! पुरुषांशीं पाय नाचवीत लाडिकपणानें बोलणाऱ्या ! भर रस्त्यांत नवऱ्याला खेटून चालणाऱ्या !

बायकांनीं अशा तऱ्हेची वर्तणूक केली तर मग बलात्कार होतील यांत नवल नाहीं ! आपण नीट वागलें म्हणजे पुरुष बेताल होतील कसे ! आतां यमुनेचीच गोष्ट पहा ना ! ती सत्तावीस वर्षांची होती. म्हणजे अगदीं तारुण्याच्या उमेदींत होती. शिवाय ती अविवाहित होती. पण अजून एकाहि पुरुषाला तिनें आपल्याशीं लगट करूं दिली नव्हती.

समाधानानें यमुनेनें समोरची वही बाजूला ठेवली, आणि दुसरी वही पुढें घेतली. तिची बारीक नजर चुका शोधूं लागली. तिच्या मनांत शंका आली कीं आपण आधींच्या निबंधाला उगाचच ' good ' शेरा दिला. त्या मुलीनें आपल्याला फसवलें असें तिला वाटूं लागलें. सरळ good शेरा घेतला म्हणजे काय ! भलतेंच ! good ! good असा काय वाटेवर पडला होता कीं काय ! good शेरा मिळणें काय तंग कांचोळ्या आणि झिरझिरीत पोलकें घालण्याइतकें सोपें होतें ? ती काय चार पोरें झालेली काळेबाई होती कीं तिनें भरमसाटपणें very good शेरे द्यावे...तिच्या कपाळाला ठराविक बारीक आंठी पडली, आणि आपल्या good शेऱ्याला ती अधिकच जळूं लागली.

वह्या इकडच्या तिकडे करतांना आणि लिहितांना तिचीं काटकुळीं टोंकदार कोपरें विणकामाच्या सुयांसारखीं पुढेंमागें होत होतीं. तिची काटकुळी पाठ ताठ ठेवलेली होती. आणि दंडाच्या फटींतून दिसणारे तिचे स्तन इवलेसे, खुरटलेले होते. जणूं पोटच्या गोळ्याच्या तोंडांत दुग्धधारा ओतण्याच्या अनिवार इच्छेच्या झिणझिण्या त्यांनीं कधीं अनुभवल्याच नव्हत्या. तिच्या किरकोळ मानेला उभी खळगी पडली होती. आणि त्या मानेवर भाबडें डोकें होतें. तिचे केंस निर्जीव वाटायचे. त्यांना तकाकी अशी नव्हतीच. तिच्या जीवनवेलींतला रस जणूं कोणी शोषून घेतला होता, जणूं ती कधीं तरारून वाढणार नव्हतीच ! जणूं ती एखाद्या वृक्षाला लपेटून टाकणारच नव्हती ! जणुं तिच्यांतून लालभडक कोंब फुटणारच नव्हते.

बऱ्याच वेळानंतर वह्या तपासून झाल्या, आणि यमुना स्वस्थ बसून

राहिली. तिची आई अंमळ आडवी झाली होती, आणि घरांत दुसरें कोणी नव्हतेंच. दुपारच्या वेळीं तिला तो चमत्कारिक एकाकीपणा जाणवूं लागला. तिला वाटूं लागलें कीं सगळ्या माणसांनीं आपल्या भोंवतीं जमावें आणि आपली समजूत काढावी. उजेडाचा हलणारा कवडसा, कबुतराची फुगवलेली हिरवी मान, ठिबकणारें पाणी, मखमलीच्या पेटींत चमकणारीं मोतीं अशा अनेक गोष्टींची तिला आठवण झाली आणि उगीचच हुरहुर वाटूं लागली. तिला वाटूं लागलें कीं आपण सगळ्यांशीं फार फार चांगलें वागावें, समाजाची सेवा करण्यांत शरीर झिजवावें, आणि अफाट सागराच्या वालुकामय तीरावर मरून जावें... कापरासारखें जळून जावें...

आपल्या मनांत येणाऱ्या त्या विचित्र विचारांची यमुनेला भीती वाटली. तिनें आपलें मन अधिक निष्ठुर केलें. वृत्ती अधिक शुष्क केल्या. आणि अखेर उठून ती आपल्या मैत्रिणीकडे जायला निघाली. वाटेंत एका नाक्यावर एक माणूस रेंगाळत होता. यमुनेला पाहून तो झपाझप तिच्या मागून चालूं लागला. यमुनेच्या तें ध्यानांत आलें. त्यासरशीं तिनें आपला पदर लपेटून घेतला, अंग चोरलें. तिची छाती धडधडूं लागली. जणूं जगाचा अंतकालच समीप आला असें तिला वाटलें. तितक्यांत तो मनुष्य पटकन् तिला धक्का देऊन पुढें गेला. आणि तेवढ्यांत तो कांहीं घाणेरडे शब्द पुटपुटला.

क्षणभर यमुना स्तिमित झाली. पण मग तिनें आपलें अत्यन्त उग्र अस्त्र बाहेर काढलें. एखाद्या भयंकर शाप देणाऱ्या मुनीप्रमाणें आपण आहोंत असें तिला वाटलें. चारचौघांना ऐकूं जाईल इतका आपला आवाज चढवून ती म्हणाली, " चपलेनें थोबाड फोडायला हवंय कां? थोबाड फोडायला हवंय ?"

अजूनपर्यंत असें ती कधीं कोणाला बोलली नव्हती. कोणी धक्का दिला तर ती त्याच्याकडे रागाचा दृष्टिक्षेप टाकीत असे आणि स्वतःशींच कांहींतरी पुटपुटत असे. पण आज मात्र तिनें विलक्षण धैर्य दाखविलें होतें. तिला वाटलें, कीं आतां सगळे लोक त्या माणसावर तुटून पडतील,

त्या माणसाचें तोंड काळेठिक्कर पडेल... पण तसें कांहींच झालें नाहीं. दोनचार लोक तिच्याकडे कुतुहलानें पाहूं लागले. एकानें त्या माणसाला शिवी हांसडली. आणि तो माणूस झपाझप पावलें टाकीत तेथून पसार झाला.

प्रक्षुब्ध मनःस्थितींत ती आपल्या मैत्रिणीच्या खोलींत शिरली आणि ती कांहीं बोलणार इतक्यांत तिच्या मैत्रिणीनें धांवत येऊन तिचे दंड पकडले आणि तिला गदगदां हलवून ती म्हणाली, " यमुना ! यमुना ! मी—मी—माझं—माझं लग्न ठरलं आहे. त्यांचं नांव माहीत आहे कां तुला ? त्यांना पाहिलं आहेस तरी कां तूं ? पहा ! हा फोटो पहा ! कित्ती छान आहे नाहीं आणि खालचं नांव वाचलंस तूं ? नाहीं वाचतां येत ? वाचतां येत ? अहा ग वेडी ! मीं सांगूं ? तर तर ! लाजेन असं वाटत कीं काय तुला ? "

तिची बडबड चालूंच राहिली. इकडे यमुना मात्र चकित झाली. मूढपणानें ती आपल्या मैत्रिणीकडे पहात राहिली. आपली मैत्रिण तिला एकदम परकी वाटूं लागली. त्या फोटोंतल्या तरुणाच्या स्पर्शानें ती विटाळली आहे ही जाणीव तिला असह्य झाली. आपल्या मैत्रिणीच्या हातांतून तिनें स्वतःची सुटका करून घेतली. तिला वाटूं लागलें कीं आपल्या मैत्रिणीनें आपला विश्वासघात केला. एकदम तिच्या मस्तकात संताप भिनला. तिला वाटलें कीं आतां पुरे झालें हें जगणें. आतां आपण कापरासारखें जळून जावें.

तिची मैत्रिण तिला गदगदां हालवीत म्हणाली, " अग, बोल ना ! बोल ! "

यमुना शुष्कपणानें म्हणाली, " बोलायचं काय ? छान आहे कीं ! Congratulations ! पण काय करायचं तें जपून कर. "

वर्तमानपत्रांतल्या सगळ्या फूस लावून चळविल्याच्या आणि बलात्काराच्या हकिगती तिला आठवल्या आणि ती पुढें म्हणाली, " माणसें दिसतात तशीं बसतात. "

इतका वेळ स्वतःच्याच तंद्रींत असलेल्या तिच्या मैत्रिणीनें यमुनेच्या डोळ्यांत शोधकपणें पाहिलें. आणि मग एकदम चवताळलेल्या वाघिणी-सारखी ती हातवारे करून किंचाळली, " मला माहीत आहे, माझा तुला मत्सर वाटतो आहे. माझ्या सुखांत तुला बिब्बा घालायचा आहे. पण आतां मीं मुळींच फसणार नाहीं ! त्यांना कध्धीं कध्धीं सोडणार नाहीं. तुझ्यामुळें. तुझ्या संगतींत राहिल्यामुळें माझ्याविषयीं गैरसमज झाले. त्यामुळें माझं लग्न इतके दिवस राहिलं आणि आतां...आतां..."

आपल्या मैत्रिणीला वेड लागलंय कीं काय तें यमुनेला कळेना. आपल्यावरचे ते भयंकर आरोप ऐकून तिचें मस्तक सैरवैर झालें. तिनें आपल्या कानांवर घट्ट हात ठेवले. तिला वाटलें कीं आपण किंचाळून सांगावें, ' हें साफ खोटें आहे. माझ्यावरसुद्धां एका माणसानं प्रेम करण्याचा प्रयत्न केला होता. मला सिनेमाला बोलावलं होतं. पण मी त्याला झिडकारलं. तरुण स्त्रीला सिनेमाला बोलवायची शरम कशी नाहीं वाटत, असं खडसावून विचारलं. आणि अजूनसुद्धां लोक मला धक्के मारतात. आतांच एका माणसानें मला धक्का मारला. पाहिजे तर बघायला चल. अजून तो मनुष्य तिथें असेल. '

पण अर्थात् यमुना ह्यांतलें कांहींच बोलली नाहीं. ती म्हणाली, " तुझें डोकें फिरलें आहे. तूं काय बोलते आहेस त्याचा अर्थ तुला समजत नाहीं. " आणि झटक्यासरशीं ती तेथून निघून गेली. रस्त्यांत ती सारखें स्वतःला पटवून देत होती कीं आपल्यावर पुरुषांनीं प्रेम केलें आहे, आपल्याविषयीं पुरुषांनीं अभिलाषा बाळगली आहे. रस्त्यांतल्या प्रत्येक माणसाच्या डोळ्यांत ती कल्पनेनें अभिलाषा पहात होती. ती घरापर्यंत आली तेव्हां तिला फार फार थकल्यासारखें वाटत होतें. तिनें घरांत प्रवेश केला तो आपल्या आरामखुर्चीवर स्वस्थपणें झोंपण्याच्या इराद्यानें.

पण आरामखुर्चीकडे पहातांच ती दचकली ! तथ एक तरुण पुरुष बसला होता. जणूं ती आरामखुर्ची आणि तें घर आपल्याच मालकीचें आहे अशा थाटांत बसला होता. निदान यमुनेला तसें वाटलें. यमुनेनें

आपल्या आईकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें. पण तिनें उत्तर द्यायच्या आधींच तो हंसून म्हणाला, " आपली आणि माझी ओळख नाहीं. आपल्या आजोळच्या माणसाची आणि माझी ओळख. मुंबईत कामाकरितां यायचें होतें तेव्हां तीं माणसें म्हणालीं कीं इथें उतरा. उद्यां सकाळीं मी जाणार. एक दिवस मात्र आपला पाहुणचार झोडणार ! " तो परत मोठ्यानें हंसला, आणि मग उठून त्यानें तेथल्या खिडकीचा नेहमीं बंद असणार पडदा खसकन् उघडून टाकला.

समोरच्या चाळीच्या गॅलरींत बायका उभ्या होत्या. त्यांनीं त्या तरुणाकडे पाहून घेतले आणि आपसांत त्या कांहींसें कुजबुजल्या. त्या कुजबुजणाऱ्या साळकायामाळकायांचा यमुनेला संताप आला. प्रत्येक गोष्टीकडे संशयानें पहाणाऱ्या यमुनेला त्या बायांच्या काल्पनिक संशयीपणाचा राग आला. आणि मग त्या संशयाला कारणीभूत झालेल्या त्या तरुणाचाहि राग आला.

त्यानंतर तिला घरांत स्वस्थपणें राहणें अशक्य झालें. एका पुरुषाची नजर आपल्यावर आहे ही जाणीव, कसलीहि हालचाल करतांना तिला गोंधळून टाकत होती. आपला पदर तिनें शरीराभोंवतीं लपेटून घेतला. आणि तरी ती दृष्टि आपल्या पदरांतून सारखी आरपार जात आहे असें तिला वाटत राहिलें. त्या जाणिवेनें तिचें अंग शहारून येत होतें.

संशयाचें जाळें तिच्या मनांत विणलें जाऊं लागलें. तिला वाटलें कीं हा अनोळखी मनुष्य फसवाफसवीनें आपल्या घरांत शिरला आहे आणि त्याच्या मनांत कांहींतरी काळेंबेरें आहे. तिच्या जिवाचा थरकांप झाला. तिनें आपलें शरीर ताठ केलें, डोळे वटारले, आणि स्वःशींच ते शब्द उच्चारले, ' चपलेनं थोबाड फोडायला हवंय का ? '

तिच्या ताठलेल्या शरीराकडे आणि चेहेऱ्यावरील आविर्भावाकडे लक्ष जाऊन तो म्हणाला, " काय हो ? काय झालं ? "

ती गोंधळून गेली आणि म्हणाली, " कांहीं नाहीं अंऽ जरा चक्कर आल्यासारखं झालं. "

तें ऐकून तिची आई अगदीं घाबरून गेली. ती बडबडूं लागली, " आं ! अग चक्कर आली का ? मग पाणी नाहीं कां मागायचं ? लिंबू तरी आणायला हवं होतं खालून. तरी मी सांगत असतें कीं दुपारचीं उन्हातान्हांतून फिरूं नको. "

तो तरुण तत्परतेनें उठला, आणि यमुनेचा दंड पकडून त्यानें तिला आरामखुर्चीवर बसवलें. यमुनेच्या आईनें आणलेल्या तांब्यांतलें पाणी फुलपात्रांत ओतून तें त्यानें तिच्या हातांत दिलें.

यमुना बावरून गेली. सरळ सरळ तिचा हात एका तरुणानें धरला होता. समोरच्या चाळीच्या गॅलरींतून अनेक बायकांनीं तें बघितलें होतें. तिला वाटलें कीं वणव्यासारखी ही बातमी पसरणार आणि मग सगळे लोक आपल्या अंगावर दगड फेंकीत ओरडणार, ' मारा, मारा ! ही बाई भ्रष्ट झाली आहे ! '

यमुनेनें आपलें मन आंवरलें. टेबलावर पट्टी आपटून जशी ती मलींना गप्प बसवीत असे तसें तिनें आपल्या खुळ्या कल्पनांना गप्प बसवलें. ती दरडावून म्हणाली. " मूर्खपणा बस्स झाला ! पुरुषाचा स्पर्श झाल्याबरोबर कांहीं असं भ्रष्ट व्हायला होत नाहीं. आणि तुला दगड मारण्यापेक्षां लोकांना पुष्कळ इतर उद्योग आहेत. "

त्यानंतर तो तरुण कामानिमित्त कुठेंतरी बाहेर गेला आणि यमुनेला मोकळें मोकळें वाटलें. तिनें. हिशेबाची वही काढली आणि आईला विचारून तिनें हिशेब लिहिला आणि मग हिशेबाची वही चाळतांना तिच्या ध्यानांत आलें कीं आपण अलिकडे फार आइस्क्रीम खातों. रोज आठ आण्याचें आइस्क्रीम ! बाप रे ! काय हा उधळेपणा ! काय हा बेतालपणा ! आपला मनावरचा ताबा उडत चालला आहे अशी तिची खात्री पटली. आज आइस्क्रीम खाते आहेस, उद्यां आणखी कांहीं करायला लागशील ! — ती स्वतःलाच म्हणाली. आणि मग ती स्वतःला नाहीं नाहीं तीं दूषणें द्यायला लागली. स्वतःला दूषणें देणें आणि स्वतःवर नवे नवे निर्बंध लादणें ही तिची वृत्तीच बनून गेली होती. आणि

जसजशी ती स्वतःवर अधिक निर्बंध लादीत असे व स्वतःला दूषणें देत असे तसतसें आपलें मन आवरणें तिला अधिकाधिक कठिण होत असे. आणि शिवाय तिला वाटायचें कीं आपलें सगळेंच चुकतें आहे. पुन्हा पुन्हा तिनें हिशेबाच्या बेरजा तपासून पाहिल्या आणि तरी तिचें समाधान झालें नाहीं.

संध्याकाळीं तो तरुण हंसत हंसत घरीं आला आणि यमुनेच्या आईला म्हणाला, " चला हो , आपण सगळीं सिनेमाला जाऊं ! "

पाहुणचाराची परतफेड करण्याचा त्याचा विचार असावा. यमुनेची आई म्हणाली, " मी नाहीं बाबा सिनेमाला जात ! यमुनेला हवं तर घेऊन जा. "

यमुनेकडे वळून तो तरुण म्हणाला, " चला हो. " यमुनेच्या हृदयाचें स्पंदनच थांबलें. तीन तास एका तरुणाबरोबर एकत्र काळोखांत तिला काढायचे होते. बाप रे ! हें फार भयंकर होतें ! यमुना सिनेमाला जाणें शक्य नव्हतें, अजिबात शक्य नव्हतें.

मनाला सारखें टोंचीत आणि आंवरीत राहिलें म्हणजे तें कमकुवत होतें. ' मला येतां येणार नाहीं ' असें कांहीं यमुनेला म्हणवेना. मुकाट्यानें ती त्या तरुणाबरोबर सिनेमाला गेली. वाटेंत त्यानें तिला फुलें घेऊन दिलीं. तिच्या शाळेंतल्या मुलींनीं तिला त्याच्याबरोबर पाहिलें आणि त्या आपसांत कुजबुजल्या. एका शिक्षिकेनें तिला पाहिलें आणि ओळख न देतांच ती पुढें गेली. तिच्या ओळखीचा एक दुकानदार त्या तरुणाला सूचकपणें सांगूं लागला, " शेट ह्या बाई आमच्या नेहमींच्या गिऱ्हाईक आहेत बरें का ! त्यांना काय पसंत पडतें तें मला बरोबर माहीत आहे. ' आणि सिनेमा चालूं असतांना जेव्हां एक चुंबनाचा देखावा आला तेव्हां शेजारच्या माणसानें चटकन् मान वळवून त्या दोघांकडे पाहिलें.

यमुनेचा जीव नुसता गुदमरून गेला. घरीं येऊन तिनें कसेबसे चार घांस खाल्ले आणि ती अंथरुणावर पडली. तिच्या आईनें त्या तरुणाला

गॅलरींत अंथरूण घालून दिलें, आणि ती घरांत जाऊन झोंपली. गॅलरीचें दार तिनें सताड उघडें ठेवलें होतें.

गॅलरीचें दार सताड उघडें होतें !
गॅलरीचें दार सताड उघडें होतें !

त्या परिस्थितींत यमुनेला झोंपणें शक्यच्च नव्हतें. सारा जन्म तिनें स्वतःला पुरुषापासून कोंडून घेतलें होतें. आणि आतां तें दार सताड उघडें असतांना तिला झोंपणें कसें शक्य होतें ? जें शील तिनें इतक्या कृपणपणें सांभाळलें होतें त्याला एवढा जबरदस्त धोका असतांना ती अशी गाफील कशी राहूं शकली असती ? पुरुष किती बेताल, बेजबाबदार आणि नीच असतात हें काय तिला माहीत नव्हतें ! निराधार तरुण स्त्रियांना पकडून त्यांच्यावर बलात्कार करणें हा पुरुष जातीचा फार मोठा उद्योग होता. सारीं वर्तमानपत्रें तिला काय सांगत आलीं होतीं ? साऱ्या कथा–कादंबऱ्यांतून तिनें काय निष्कर्ष काढला होता ? तिला चक्क बेशरमपणें एका तरुणानें सिनेमाला बोलावलें नव्हतें काय ? रस्त्यांत तिला धक्के मारणाऱ्या पुरुषांचा हेतु काय उघडपणें सांगायला हवा होता ? आणि एकदां पुरुषांनीं रेल्वेच्या संडासांत काढलेलीं चित्रें तिनें पाहिलीं नव्हतीं काय ?

त्या चित्रांच्या आठवणीनें यमुनेच्या अंगावर शहारे आले. तिनें दांत-ओंठ घट्ट आंवळले आणि कॉटची कडा घट्ट पकडून ठेवली. जणूं एका भयाण गर्तेच्या कांठावर ती लोंबकळत होती.

आपल्या भडकलेल्या मनाला चुचकारण्याचा तिनें प्रयत्न केला. पण दिवसाउजेडीं जें शक्य होतें तें रात्रीच्या वेळीं शक्य होत नाहीं. शिवाय दिवसभर जें तिनें अनुभवलें होतें त्याचीं भुतं आतां तिच्या मनांत थयथय नाचत होतीं; तिच्या मस्तकांत किंचाळत—ओरडत होतीं.

दारू प्यायलेला मनुष्य जसा सरळ रेषेंत चालण्याचा प्रयत्न करतो तसा प्रयत्न तिचें मन करूं लागलें.

'...पण खरोखर तो तरुण तसा होता काय? ... तसा होता काय? ...हाः हाः हाः हाः! ...'

' चुप्! चुप! डोकें ठिकाणावर ठेव. '

' माझें डोकें ठिकाणावरच आहे. त्यानें चक्कर आली ह्या गोष्टीचा फायदा घेऊन तुझा दंड पकडला. मोठ्या हिकमतीनें तो तुला एकटीला सिनेमाला घेऊन गेला. त्यानें फुलें घेऊन दिलीं. ज्या सिनेमाला तो तुला घेऊन गेला त्यांत किती चुंबनें होतीं तीं तूं मोजलीस? आणि त्या एका चुंबनाच्या वेळीं खुदकन् हंसला तो? आठवतंय का? आणि रस्त्यांत गर्दी झाली तेव्हां त्यानें तुझा दंड नाहीं का पकडला? आहे ना सारें लक्षांत? कीं नुसतें ढोंग करायचं आहे! काय विचार काय आहे? मजा मारायची आहे? चैन करायची आहे? '

' नाहीं. नाहीं. तसें मुळींच नाहीं. इतक्या दिवसांत मीं असें केलें कां? पण नेहमीं वाईटच अर्थ कां घ्यायचा माणसाच्या वर्तणुकीचा?'

' मला वाटतें कोणी बलात्कार केला तरी तूं त्याचा वाईट अर्थ घेणार नाहींस. '

' नाहीं, नाहीं. हा शुद्ध कांगावा आहे माझ्याविरुद्ध. येऊं दे तर खरा तो इकडे. ह्या हातांनीं त्याचा गळा दाबीन. '

सारें बळ एकवटून यमुनेनें कॉटच्या कडा घट्ट पकडून ठेवल्या. तेवढ्यांत गॅलरींत कसला तरी आवाज झाला. दार वाजलें.

यमुना ताडकन् अथरुणांत उठून बसली. तिच्या घशाला कोरड पडली. तिनें सारें शरीर ताठ केलें. घोगऱ्या आवाजांत ती म्हणाली, ' चपलेनं थोबाड फोडायला हवंय का? थोबाड फोडायला हवंय? '

पण गॅलरींतून तो आंत आला नाहीं. यमुना तशीच बसून राहिली. तिला वाटलें कीं आपण उठल्याचें त्यानें पाहिलें असावें, आणि म्हणून तो दबा धरून बाहेर बसला असावा. आपण झोंपलों कीं आपला दुष्ट डाव साधायचा असा त्याचा कावा असावा. यमुना तशीच ताठ बसून राहिली. बराच वेळ बसून राहिली. पण कांहींच हालचाल होईना.

मग तिनें गनिमी कावा वापरण्याचें ठरविलें. ती अंथरुणांत पडून राहिली. तिला वाटलें कीं आतां तो येईल. पण गॅलरींतून कोणींच आलें नाहीं.

म्हणजे ? त्याचा विचार तरी काय होता ? अशा ताणलेल्या मनःस्थितींत तिला बराच वेळ ठेवून तिचें मन विकल झाल्यावर आपला डाव साधायचा त्याचा बेत होता कीं काय ? मग ? आतां कसें करायचें ?

पण. आतां डोकें शान्त ठेवणें तिला अशक्य होतें. ती गोंधळून, वेडावून गेली. जें काय व्हायचें तें लवकर होऊं दे एवढीच ती प्रार्थना करूं लागली. अखेर तें सारें अगदीं असह्य झाल्यावर ती उठली आणि भीत भीत त्या गॅलरीच्या दरवाज्याशीं गेली. धडधडत्या हृदयानें तिनें बाहेर डोकावून पाहिलें. आणि तिची निराशा झाली.

तो शांतपणें झोंपला होता. अगदीं शांतपण! त्याची छाती संथपणें वरखालीं होत होती. त्याच्या नाकपुड्या प्रसरण पावत होत्या आणि संकुचित होत होत्या. मध्येंच वारा आला कीं त्याच्या कपाळावरचे केंस हालत.

त्याला तसा झोंपलेला पाहून तिला विलक्षण संताप आला. तिच्या झोंपेचा आणि मनःस्वास्थ्याचा असा नाश करून आपण स्वस्थपणें झोंपण्याचा त्याला कांहींएक अधिकार नव्हता. तिला वाटलें कीं लाथ मारून त्याला उठवावें आणि घराबाहेर हांकलून लावावें.

आणि असें वाटत असतां त्याच्या चेहेऱ्याकडे लागलेली नजर वळवून तिने त्याचें सारें शरीर न्याहाळून पाहिलें. झोंपेंत त्याचे कपडे अस्ताव्यस्त झाले होते. आणि त्याची केंसाळ पुष्ट मांडी एकदम तिच्या दृष्टीस पडली.

ती दृष्टीस पडतांच यमुनेच्या मस्तकाला एकदम तडा गेला. तिचें पोट कोणी ते ढवळून काढलें. तिचा श्वास जोरांत आणि अस्थिरपणें होऊं लागला. तिचें शरीर कांपूं लागलें. कापरासारखें तिचें शरीर पेटलें.

आंधळेपणानें, धडपडत ती पुन्हा आपल्या बिछान्यावर येऊन पडली. विकलतेनें मोठमोठ्यानें किंचाळावें आणि रडावें असें तिला वाटूं लागलें. तिला वाटलें कीं इतके दिवस कृपणपणें जतन केलेलें तिचें शील तिनें गमावून टाकलें होतें. तिचें पावित्र्य सगळें जळून खाक झालें होतें. तिचा स्वाभिमान कोळपून गेला होता. तिचें स्वातंत्र्य नष्ट झालें होतें. तिला वाटलें कीं त्या दृष्टिक्षेपानंतर आतां ती त्याची बटीक झाली होती. तिला भोगायचा अधिकार त्याला प्राप्त झाला होता. आतां इमानी कुत्र्याप्रमाणें त्याच्यामागून हिंडण्यापलीकडे दुसरें कांहींच ती करूं शकत नाहीं. इतके दिवस ती जें जपत होती तें जपण्याची आतां आवश्यकता नव्हती. साऱ्या स्त्रियांवर पुरुष जें चेटुक करतात तें त्यानें तिच्यावरहि केलें होतें. आणि अगदीं अभावितपणें केलें होतें. तिला वाटलें कीं त्याला जागें करून हें सगळें सांगावें आणि त्याच्या पायाशीं लोळण घ्यावी. निर्लज्जपणें आश्रयाची त्याच्याजवळ याचना करावी. आणि समजा, त्यानें आपल्याला लाथाडलें तर ?...तर ?...तर ?...तर...?

तडफडत ती आपल्या बिछान्यांत पडून राहिली. असा किती तरी वेळ गेला. ती थकली, भागली, विचार करण्याचें तिचें सामर्थ्य संपलें...

आणि झोकांड्या देत, खदखदां हंसत तो आला. दुर्योधनानें जशी थोपटली असेल तशी त्यानें आपली मांडी थोपटली.

त्याच्या राकट हातांच्या विळख्यांत तिचें अंग दुखलें. खिडकीचा पडदा फरकन् बाजूला सरकला आणि समोरच्या साळकायामाळकाया निर्लज्जपणें वांकून पाहूं लागल्या.

पण यमुनेनें विरोध केला नाहीं अगर दुःख केलें नाहीं. खिन्नपणें हंसून ती म्हणाली, ' मी तयार आहे. ' बस्स, इतकेंच ती म्हणाली आणि मग तिची शुद्धी हरपली.

यमुनेनें डोळे उघडले तेव्हां चांगला प्रकाश पडला होता. वेड्या-सारखें तिनें इकडे तिकडे पाहिलें. खरें आणि खोटें ह्यांतली सीमारेषा

शोधण्याकरितां ती क्षणभर चांचपडली. आणि तिनें आईला विचारलें, "ते गेले ? कुठें आहेत ते ?"

तिची आई म्हणाली, "अग बाई बाई बाई ! झोंप आहे की काय आहे ग बाई ही ! चांगले आठ वाजले ना ! तो आठाच्या गाडीनें नव्हता का जायचा ? मी तुला उठवीत होतें, पण तो म्हणाला, 'नको, कशाला उगीच !'

शून्यपणें यमुना समोर पहात राहिली. खिडकीचा पडदा उघडाच होता. आणि समोरच्या साळकायामाळकाया तिच्याकडे जातां–येतां पहात होत्या.

# लांडगे : : २

एक कोणी तांबारलेल्या डोळ्यांचा आणि पिंगट जटांचा बुवा त्या दिवशीं नवीनच गांवांत आला होता; आणि दारोदार भिक्षा मागत होता. त्याची भाषा कोणाला समजण्यासारखी नव्हती आणि भिक्षेकऱ्याला न शोभणारा उर्मटपणा त्याच्या अंगीं होता. गांवांतल्या चहाच्या हॉटेलांत जाऊन त्यानें चहा घेतला आणि त्याचे पैसे मागितल्यावर तो दुकान-दाराच्या अंगावर शिव्या देत धावून गेला. दुकानदार बापडा घाबरून मागें सरकला. तो धीर करून पुन्हां पुढें होणार इतक्यांत बुवानें छाटींतला आपला हात बाहेर काढून दुसऱ्या हातावर चोळला. विस्तवाची एक ज्वाला दुकानदाराच्या डोळ्यासमोर तरळली. आणि तो बुवा पुढें चालता झाला. त्यादिवशीं त्या दुकानांत चहाबरोबर ह्या हकिकतीचा खमंग शेवचिवडा देखील गिऱ्हाइकांनीं फुकट खाल्ला.

इकडे तो बुवा दारोदार पसापसा धान्य गोळा करीत गांवभर हिंडला. त्या गांवच्या एका कडेला एक मध्यम वयाची विधवा बाई आपल्या तरण्या पोरीबरोबर रहात असे. त्या दोघींना अन्नवस्त्राचें कांहीं साधन नव्हतें; आणि कोणाचा आधार पण नव्हता. भेदरलेल्या मेंढ्यां-सारख्या त्या दोघी त्या गांवांत दिवस काढीत असत. सगळ्यांचीं कामें करीत. सगळ्यांना कृतज्ञता दाखवीत. साऱ्यांच्या इच्छेपुढें मान वाकवीत. त्यामुळें साऱ्या गांवची त्यांना सहानुभूति होती. आणि साऱ्या ग्राम-कंटकांचा त्या मायलेकींवर डोळा होता.

तणतणत निघालेला तो बुवा ह्या दोघींच्या घरापुढें गेला. त्याचा

अवतार पाहून ती पोर घाबरली. आणि पसाभर धान्य आणून तिनें त्या बुवाच्या छाटींत टाकलें. पण त्या बुवानें आपल्या जळजळीत नजेरनें तिच्याकडे रोखून पाहिलें. दोनवेळां तिच्या चेहेऱ्याभोंवतीं हातवारे केले, आणि तिला आपल्याबरोबर चलण्याची खूण केली. मूढपणें ती पोर त्या बुवाच्या मागोमाग चालूं लागली. तिच्या आईनें तें पाहिलें आणि ती किंचाळत मागून धांवली. आपल्या पोरीचा हात धरून तिनें तिला मागें खेंचलें. आणी त्या बुवाला शिव्याशाप देऊं लागली.

त्या बुवानें आपल्या छाटींतून एक कुंकवाची मूठ काढली व त्या मायलेकींवर उधळली. मग तो पुढें चालूं लागला. कुंकवानें माख-लेल्या कपाळानें ती विधवा आणि तिची कुंवार पोर आपल्या घरांत शिरल्या.

लोक जमा व्हायच्या आंतच तो बुवा बाबू आडवणकराच्या घरापाशीं गेला. आणि कोणाला न समजणाऱ्या भाषेंत भिक्षा मागूं लागला.

बाबू आडवणकर म्हणजे ताडासारखा उंच आणि खडबडीत माणूस. त्याला फार बोलायची संवय नव्हती. तो बोललाच तर उणेंपुरें बोलायचा. आणि तेवढ्या चार शब्दांनीं ऐकणाऱ्याच्या काळजाचें पाणी होत असे. गांवांतले लोक त्याला हलक्या आवाजांत सैतान म्हणत असत. ह्या सैतानानें दोन बायका केल्या होत्या. त्या दोन्ही लवकरच मेल्या. पण दोघींनीं मागें पोरवडा ठेवला होता. त्यांतलीं निम्मीं मुलें मेलीं होतीं. कोणी देवींनीं, कोणी पटकीनें, कोणी आणखी कशानें. बाबू आडवण-करचा एक मुलगा विहिरींत पडून मेला होता, पण लोक म्हणत कीं तें खोटें बाबूनें म्हणे रागानें त्याला उचलून दगडावर आपटला होता, आणि त्यामुळें तो मेला होता. आतां बाबूला चार पोरें शिल्लक होतीं. तीन मुलगे आणि एक मुलगी. तीं चार मुलें म्हणजे माणसाची अवलाद नसून लांडग्यांची अवलाद होतीं. तीं सारीं सारखींच होतीं. मुलगी कांहीं मुलांहून कमी नव्हती. गांवांतल्या अनेकांवर तिनें तोहमत

आणली होती. अनेकांची अब्रू तिनें चव्हाट्यावर आणली होती. अनेकांचीं घरेंदारें धुऊन नेलीं होतीं. खुद्द गांवच्या सावकाराला तिनें एकदां कचाट्यांत पकडलें होतें. आपल्या भावांच्या बरोबरीनें ती शिवीगाळ करीत असे. आणि मारामारीलाहि ती मागें सरकणारी नव्हती. त्या मुलांतला मोठा मुलगा होता बिनबोलका, पण मोठा कावेबाज होता. सगळ्या हिकमती तो लढवीत असे आणि त्या अमलांत आणण्याचें काम दुसरे दोघे पार पाडत असत. ह्या दोघांचीं तोंडें बेसुमार चालत आणि प्रसंग पडला तर वाटेल तो काफरपणा करायला हात कांहीं कचरत नसत. लांडग्यासारखीं हीं माणसें ! अकारण कोणावरहि तीं तुटून पडत. पिकेंच्या पिकें उपटून टाकत. कुंपणांची विल्हेवाट लावीत. गंज्या पेटवून देत. घरें फोडीत आणि इतकें करून परत नामानिराळें रहाण्याइतकी हिकमत त्यांच्या अगीं होती.

अशा माणसांना शोभेसा एक कुत्रा नेहमीं त्यांच्या दारांत असे. काळाकुळकुळीत मोठा थोरला कुत्रा होता त्यांचा. त्याचें पोट नेहमीं खपाटीला गेलेलें असे. त्याचे दांत लोकांनीं तरी नेहमीं विचकलेलेच पाहिले होते. त्याची झुपकेबाज शेपटी कधीं प्रेमानें अगर कृतज्ञतेनें हलतांना कोणी पाहिलेली नव्हती. त्याला खायला घालून फितवण्याचा प्रयत्न लोकांनीं केला होता. पण त्यांच्या हातचें खाऊन तो त्यांनाच डसला होता. खुद्द बाबू आडवणकराच्या घरांतील माणसांनाहि त्यानें डसायला कमी केलें नव्हते. आणि त्यांनींहि त्याला दोन पुरुष लांबीच्या बांबूंनीं झोडपलें होतें. सारांश, कुत्रा त्या घराला साजेसा होता.

आपल्या विचित्र भाषेंत बडबडत जेव्हां त्या बुवानें बाबू आडवणकराच्या दारांत भिक्षा मागितली तेव्हां तो भयंकर कुत्रा त्याच्या अंगावर धावून गेला आणि कचकन् त्यानें त्या बुवाच्या पायाचा लचका तोडला. शिव्या देत, ओरडत, तो बुवा कुत्र्याशीं झगडूं लागला. आणि घराच्या दारांत उभीं राहून बाबू आडवणकराचीं पोरें खदखदां हंसूं लागलीं.

अखेर त्यांतला मोठा पोरगा पुढें झाला; त्यानें कंबरड्यांत सोटका

ाणून कुत्र्याला दूर केलें. आपल्या रक्ताळलेल्या पायांकडे पाहून त्या ावाचें डोकें फिरलें. पेटलेल्या नजरेनें त्या माणसांकडे पहात त्यानें एक द्राक्ष त्यांच्याकडे फेकलें आणि अद्वातद्वा बडबडत आपल्या रक्ताळलेल्या ायांनीं तो दूर निघून गेला.

परत त्याला त्या गांवांत कोणीहि कधींहि पाहिलें नाहीं.

* * *

बाबू आडवणकराच्या दोन बायका मेल्यानंतर त्यानें लग्न केलें नव्हतें. किंबहुना तें होऊं शकलें नव्हतें. मोठ्या मिनतवारीनें त्याच्या पहिल्या ालाचें लग्न झालें होतें. पण एकदां लग्न होऊन त्याच्या घरांत गेलेली ी मुलगी पुन्हां जिवंतपणीं लोकांच्या नजरेला पडली नव्हती. मधून मधून तेच्या किंचाळ्या मात्र लोकांच्या कानांवर येत. आपल्या बहिणीची ौकशी करायला जेव्हां तिचा भाऊ आला तेव्हां कुत्रा अंगावर घालून याला पिटाळून लावण्यांत आलें होतें. नंतर चार माणसें घेऊन खुद्द ेचा बाप आला तेव्हां त्याला घरांत घेण्यांत आलें.

पण त्या मुलीनें मोठ्या काकुळतीनें सांगितलें कीं, मी मोठ्या ानंदांत आहे. मला खायलाप्यायला, कपडेलत्ते, दागदागिने, सगळें ांहीं भरपूर आहे. मला सगळीं प्रेमानें वागवतात. मला माझ्या माणसांना ोडून माहेरीं जायचें नाहीं. तुम्हीं जा. आईला माझा नमस्कार सांगा. ैत्रिणींना माझी आठवण करा. भावाचें लग्न लावून द्या. गांवच्या ेवीला सांगा कीं, माझें कांहीं चुकलें असलें तर क्षमा कर !

तिचें हें बोलणें एकंदर फार संशयास्पद वाटलें. धाकदपटशा ाखवून तिला पढवून ठेवलें आहे असें वाटलें. पण तेव्हां कांहीं कमीजास्त ोलण्यांत अर्थ नव्हता. तेव्हां म्हातारा शहाणपणानें कांहीं न बोलतां ाहेर पडला आणि पंचायत भरवायचा त्यानें विचार केला. पण तें हायच्या आधींच त्याची पोरगी मेली. लोक म्हणत कीं त्या पोरीचें ारें अंग डागांच्या खुणांनीं भरलेलें होतें.

त्यानंतर अर्थात बाबू आडवणराच्या घरांत कोणी आपली मुलगी देणें शक्यच नव्हतें, त्यामुळें त्याचे मुलगे लग्नाचे राहिले होते. त्या हूड, आडदांड, मनस्वी पोरांना ती परिस्थिती असह्य होई. गांवांतल्या पोरीबाळींशीं ते लगट करण्याचा प्रयत्न करीत. नाचतमाशांतील बायकांशीं सलगी करूं पाहात. पण कोठेंच त्यांना थारा मिळत नसे. आणि मिळाला तर ताबडतोब त्याचा गैरफायदा घ्यायला तें मागें पुढें पहात नसत.

एक दिवस ते दोघे धाकटे भाऊ चहाच्या दुकानांत बसले होते. इतक्यांत चहा प्यायला आलेल्या एका माणसानें दुकानदाराची थट्टा करायला सुरवात केली, " काय मालक ! आतां लगिनाचा बार कवा उडायचा ? "

त्या दोघां भावांनीं कान टवकारले.

" नाय बा ! आवंदा काय इचार नाय — " मालक वेड पांघरून म्हणाला.

" आतां कशाला येड पांघरतां ? साऱ्या गांवाला माहीत झालंय् कीं ! "

" पन मी तर कोणाजवलच बोललेला नाय. " मालकांनीं अभावितपणें लग्न ठरल्याचें कबूल केलें.

" अवो, तुमी नाय बोलला म्हणून, येशी मावशी बोलायची थांबते का काय ? "

येशी मावशीचा उल्लेख ऐकून त्या दोघांनीं एकमेकांकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें.

" आत्तां ? "

" अन ' आत्ता ' कशापाई करतां ? तुमच सिनेमांतल्यावानी पिरिम चाललंय, त्ये काय गांवाला दिसत नाहीं व्हय ? साड्या काय,

तेलाच्या बाटल्या काय ? अव, त्या पोरीला काय बालिष्टरीन बनवायची आहे का काय ? ''

ह्यावर तो दुकानदार भाबडेपणानें आणि अभिमानानें हंसला. आपण खरेंच सिनेमांतल्याप्रमाणें प्रेम केलें असें त्याला वाटूं लागलें.

आणि त्याच वेळेला हे दोघे भाऊ आपल्याशींच हंसले. मग काय वेडेवाकडे विचार त्यांच्या मनांत आले होते कोण जाणें. आणि नंतर एकदम दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें. अगदीं सहजपणें. पण तेवढ्या वेळांत दोघांनीं स्वतःला अनेक प्रश्न विचारले. आणि त्यांचीं वेडींवाकडीं उत्तरें मिळविलीं.

त्यानंतर ते दोघे भाऊ रोज एकमेकांना चुकवून त्या विधवा बाईच्या म्हणजे येशी मावशीच्या घरीं खेट्या घालूं लागले. त्या दुकानदारावर मात करण्याकरतां ते रोज कांहीं तरी भेट त्या पोरीकरितां घेऊन येत असत. न बोलतां ते त्या वस्तू तिच्यापुढें ठवीत आणि मग तिच्याकडे आधाशीपणानें पहात रहात—मालकाच्या हातांतल्या खायच्या वस्तूकडे कुत्रा पहातो त्याप्रमाणें. ह्या पलीकडे प्रेम कसें करायचें तें त्यांना माहीत नव्हतें. तासन् तास ते बसून रहात. कधीं कधीं ते बोलण्याचा प्रयत्न करीत. पण शिवीगाळीपलीकडे बोलणें त्यांना येत नव्हतें. त्यामुळें ते प्रयत्न अयशस्वी ठरत. आणि त्यांना नुसतेंच गप्प बसून रहावें लागे.

त्यांची ही वागणूक म्हणजे गांवांतला थट्टेचा विषय झाला.

पण येशी मावशी आणि तिची मुलगी ह्यांना मात्र तो फार त्रासाचा विषय झाला. त्या भावांनीं दिलेल्या भेटी घेणें त्यांना शक्यच नव्हतें. तशी रीत नव्हती. गणपत दुकानदाराच्या भेटी त्या घेत असत, कारण त्याच्याशीं त्या पोरीचें लग्न जवळ जवळ ठरल्यासारखें झालें होतें. ह्या भेटींची गोष्ट तशी नव्हती. ह्या केवळ त्यांना त्रासदायक ठरत असत. त्या दोघां भावांना ' आमच्याकडे येऊं नका ' असें त्यांनीं

अनेकदां निक्षून सांगितलें. पण त्यांच्यावर त्याचा कांहींच परिणाम होईना. आणि गांवांतल्या इतर माणसांकडे तक्रार करण्याची हिंमत त्या गरीब मायलेकींना होईना. अशा त्या दोघी बिचाऱ्या गांजून गेल्या.

इकडे त्या दोघांचीं आपापसांत भांडणें सुरू झालीं. इतके दिवस एकत्र फिरणारे ते भाऊ एकमेकांपासून फुटले. हातांत दांडके घेतल्या-शिवाय ते फिरेनासे झाले. परस्परांच्या भीतीनें दारें लावून निरनिराळ्या खोल्यांत झोंपूं लागले. बहिणीनें केलेला भाकरतुकडा संशयानें कोणी खाईना. वळचणीच्या कोयत्याला दोघे एकदम हात घालीत आणि वर्दळीवर येत. कधीं कधीं मारामारीचे प्रसंग उद्भवत. बाबू आडवणकर आणि त्याचा मोठा मुलगा अशा वेळीं लांब लांब बांबू घेऊन त्यांना धमकावीत आणि त्यांच्या मारामाऱ्या सोडवीत. एकदां काम करताना एकाचा कोयता दुसऱ्याच्या पायावर बसला. दुसऱ्यानें हाताजवळचा दगड त्याच्या कपाळांत हाणला. दोघे जखमा बांधून आठ दिवस बसले. एकमेकांना शिव्या देत त्यांनीं ते दिवस काढले. एकमेकांविषयीं वाटणारी भीति घालविण्याकरितां ते दारू पिऊन तर्र होत आणि परस्परांवरचा राग गांवांतल्या इतर लोकांवर काढीत. त्यांची एकजूट मोडल्यामुळें गांवांतले लोकहि संधि साधून त्यांना मारहाण करीत.

असे दिवस चालले होते. इतके दिवस जें विष तें कुटुंब इतरांवर ओकीत असे तें आतां त्यांच्याच अंगांत भिनूं लागलें.

एक दिवस येशी मावशीकडे दोघे एकदमच येऊन पोहोंचले. त्यांना पाहून दोघी मायलेकी दार लावून आंत जाऊन बसल्या. बाहेर दोघांचे शब्दावर शब्द वाढले. मारामारीचा प्रसंग आला. तेव्हां मात्र येशी मावशीचा धीर सुटला आणि ती धावत गणपत दुकान-दाराच्याकडे गेली. गणपत हीच संधि पहात होता. चार माणसें घेऊन तो येशीच्या घरीं गेला. आणि त्यानें त्या दोघांना हांकून काढलें. एकाला तर त्यानेंच गचांडी मारली. त्यावेळेला त्यानें ज्या खुनशी नजरेनें गणपतकडे पाहिलें त्यामुळें गणपत चांगलाच चरकला.

त्यानंतर ते दोघे येशी मावशीकडे गेले नाहींत. सारें थंडावल्यासारखें वाटूं लागलें. आठ पंधरा दिवस कांहींच विशेष घडलें नाहीं. त्या दोघांतला एक तर गणपतच्या दुकानांत चहा घ्यायला पुन्हा येऊं लागला. गणपतजवळ आपल्या भावाला तो यथेच्छ शिव्या देत असे. आपण येशी मावशीच्या पोरीशीं लग्न करायचा बेत सोडून दिला असेंहि त्यानें आश्वासन दिलें.

गणपतनें अर्थातच त्याचें बोलणें मनावर घेतलें नाहीं. येशी मावशीच्या मागचा त्रास चुकला ह्याच आनंदांत तो होता.

आणि एके दिवशीं रात्रीं गणपतच्या दुकानाला आग लागली. गणपत बोंबलत उठला आणि बाहेर आला. दूर एक माणूस त्याला पळतांना दिसला. हातांतली चूड टाकून द्यायला तो विसरला होता. आणि त्यामुळेंच तो दिसत होता. इतक्यांत दुसरा एक मनुष्य आला आणि त्यानें त्या पळणाऱ्या माणसाला पकडलें आणि गणपतला हांका मारण्याचा सपाटा चालवला. त्या ऐकून गणपत धांवला. त्या खुनशी नजरेच्या बाबू आडवणकराच्या पोराला त्याच्या भावानें पकडून ठेवलें होतें. गणपतनें त्याला मदत केली आणि दोघांनीं त्याला पकडून आणलें.

इकडे आजूबाजूला लोकांनीं आग विझवण्याचा प्रयत्न केला, पण तो फारसा यशस्वी झाला नाहीं. गणपतचें दुकान आगीच्या भक्ष्यस्थानीं पडलें.

आग लावणाऱ्या त्या बाबू आडवणकराच्या पोराला पोलिसच्या हवालीं करण्यांत आलें. पोलिसांनीं त्याला पकडलेला पाहून त्याचा भाऊ खदखदां हंसला आणि म्हणाला, " जा, आतां फोड खडी ! "

तो दांत विचकून वसकन् ओरडला, " अरे, आतां खडी फोडीन. पण मग त्याच हातांनीं तुमच्या मुंड्या मुरगाळीन ! "

हें ऐकून गणपत दचकला. पण त्याचा भाऊ मात्र खदखदां हंसत राहिला.

तितक्यांत त्या दोघांचा बिनबोलका कावेबाज भाऊ तेथें आला आणि पोलिसांनीं पकडलेल्या आपल्या भावाकडे एकदां तुच्छतेनें पाहून निघून गेला. जणुं त्याला म्हणायचें होतें, " थूः तुझ्या अकलेवर ! साधी आग लावून पण पळतां येत नाहीं ? "

पोलिसांनीं त्या भावाला नेलें आणि त्याला सजा झाली.

त्या प्रसंगानंतर गणपतची आणि त्या दुसऱ्या भावाची दोस्ती झाली. गणपत दुबळ्या मनाचा होता, मूर्ख होता. ह्या निष्ठुर, करारी आणि कावेबाज माणसाचें ह्याच्यावर वजन बसलें आणि गणपत त्याच्या काबूंत गेला. त्याच्या इच्छेप्रमाणें सारें होऊं लागलें. त्याने चोऱ्या केल्या आणि गणपतनें तो माल आपल्या घरीं ठेवला. त्यानंतर तो बाबू आडवणकराचा पोर गणपतवर डाफरूं लागला. त्याच्या जवळची वाटेल ती वस्तू उचलूं लागला. आणि गणपत तें मुकाट्यानें सहन करूं लागला. मात्र अजून आपण गणपतचे दोस्त आहोंत असें तो भासवत असे. आणि येशी मावशीच्या पोरीशीं आपल्याला लग्न करायचें नाहीं असें म्हणत असे.

त्यानंतर जात्रेचा दिवस आला. बाबू आडवणकराच्या पोरानें आपली बैलगाडी बाहेर काढली. त्याची बैलजोडी नेहमीं मोठी तयार असे. आणि अशा बेदरकारपणें तो गाडी हांकीत असे कीं त्याच्या गाडीबरोबर शर्यत खेळण्याची कोणाची हिंमत होत नसे. मोठ्या आग्रहानें त्यानें गणपतला आपल्या गाडींत घेतलें आणि येशी मावशीला व तिच्या पोरीलाहि बोलावलें. चौघेजण गाडींतून जत्रेला गेलीं. देवदर्शन झालें. खरेदी झाली. सारींजण पाळण्यांत बसलीं आणि येशी मावशीची पोर पाळणा वर जातांच डोळे मिटून किंचाळली. मग सारींच हसलीं. बाबू आडवणकराचा पोर तर गदगदून हंसला आणि त्यानें गणपतला चिमटा काढला. आणि तिन्ही सांजांच्या वेळेला तीं चौघें गाडींतून परतलीं. बाबू आडवणकराचा मुलगा गाडी बेफाम हांकीत होता. आणि एकदम् अचानक त्यानें आडरस्त्याला गाडी घातली.

गणपत म्हणाला, " अरे, हें काय? हें काय? "

बाबू आडवणकराच्या पोरानें असा बहाणा केला कीं बैल आपल्याला आवरत नाहींत. तेव्हां गणपतनें कासरें हातांत घेतलें. आणि तीं संधि साधून बाबू आडवणकराच्या पोरानें त्याच्या डोक्यांत अणकुचीदार दगड मारला आणि त्याला गाडीबाहेर ढकलून दिलें. गणपतची मान मोडली आणि तो मेला. आणि मग कोकलणाऱ्या येशी मावशीला त्यानें गाडीबाहेर उतरवलें आणि त्या दांतखीळ बसलेल्या पोरीला एका हातानें कवटाळून तो दूरवर आडरस्त्यानें आपली गाडी घेऊन गेला.

आणि मग एकदम त्याच्या ध्यानांत आलें कीं, आपलें चुकलें. ठरवल्याप्रमाणें आपण केलें नाहीं. त्याचा विचार असा होता कीं गाडी उलटण्याचा बहाणा करायचा. त्यामुळें गणपत आणि येशी मावशी दोघें मेलीं असें सांगायचें. आपण स्वतःहि थोडें जखमी व्हायचें आणि कांहींतरी करून त्या पोरीचें तोंड बंद करायचें. तिला फितवायचें. घाबरून सोडायचें.

पण त्यानें भलतेंच केलें होतें. त्या काफर माणसास एका मागून एक दोन माणसांना मारणें अशक्य झालें होतें. विशेषतः गरीब बापड्या येशी मावशीला मारण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं आणि गुन्हा केल्यानंतर पळून जायच्या नैसर्गिक वृत्तीला तो बळी पडला होता.

सगळें चुकलें होतें. स्वतःच्या हातानें त्यानें स्वतःचा गळा कापून घेतला होता. आपला मोठा भाऊ तुच्छतेनें आपल्याकडे पहात आहे असें त्याला वाटलें.

पण आतां काय! झालें तें झालें. त्याला कशाचीच पर्वा वाटत नव्हती. त्या खुनामुळें त्याची कामवासना चेतली होती, वेडावून गेली होती. त्यानें त्या पोरीला अधिकच कवटाळलें आणि तो दूर दूर जात राहिला.

खदखदां हंसून त्यानें त्या पोरीच्या कपाळाचें कुंकू पुसलें. मग आपल्या जवळचा गुलाल तिच्या कपाळाला फांसला आणि मग...

झालें. पुढें सगळें व्हायचें तें झालें. फरारी झालेल्या त्या बाबू आडवणकराच्या पोराला पोलीसांनीं पकडला. त्याच्यावर खटला झाला आणि त्याला फांसावर चढवण्यांत आलें. मरतांना तो म्हणाला, " अरे, मेलों तर मेलों, पण त्या पोरीच्या कपाळीं कुंकूं आहे तें माझ्या नांवचें आहे. आणि मी मेल्यावर माझा अंकूर मागें राहील अशी व्यवस्था मी केली आहे ! " आणि तो खदखदां हंसला.

पण मरतांना त्यानें मारलेली घमेंड खरी झाली नाहीं. येशी मावशीच्या पोरीला दिवस गेले नव्हते. त्यामुळें त्या मायलेकींच्या मागचा त्रास कांहीं कमी झाला नाहीं. एकंदर झाल्या प्रकाराचे शिंतोडे त्यांच्या अंगावर उडाले. आणि ते पुसून काढायला समाज तयार होईना. झाल्या प्रकाराला त्याहि जबाबदार आहेत अशी कल्पना पसरली. कालांतरानें दृढमूल झाली. कोणी त्यांना फुटक्या नशिबाच्या म्हणूं लागले. कोणी काळ्या पायाच्या म्हणूं लागले. त्यांना कोणी थारा देईना. वाळींत टाकल्यासारखी त्यांची अवस्था झाली. समाजाच्या विचित्र नीतीला धरूनच हें सगळें होतें.

त्यांचे दिवस मोठे वाईट जाऊं लागले. त्या बिचाऱ्या भेदरलेल्या मेंढरांना कोणी आश्रयदाता राहिला नाहीं. आणि अशा वेळीं एक लांडगा येऊन त्यांच्याशीं कानगोष्टी करायला लागला. बाबू आडवणकराचा मोठा मुलगा त्यांच्याकडे येऊं लागला. तो हिमकती, बिनबोलका माणूस त्या मायलेकींना क्वचित् चुचकारायचा, क्वचित् धमक्या द्यायचा, क्वचित् आशा दाखवायचा. आणि अशा रीतीनें त्या दोघी त्याला वश झाल्या. येशी मावशीच्या पोरीचें लग्न त्याच्याशीं झालें.

त्यानें सारें व्यवस्थित केलें. भटजीला फितवला. पंचायत भरवली आणि सगळ्यांना यथेच्छ दारू पाजून त्या पंचांची समजूत घातली. दोघी बाबू आडवणकराकडे राहूं लागल्या. कांहीं दिवस सगळें व्यवस्थित चाललें. त्या मायलेकी नेहमीं भेदरलेल्या असत. त्या रोड होत चालल्या क्वचित् घरांतून किंचाळ्या ऐकूं येत. पण एकंदरींत ठीक चाललें होतें.

असे कांहीं दिवस गेले. पण यानंतर येशी मावशी घराबाहेर

पडेनाशी झाली. तिची मुलगी अधिकच भेदरल्यासारखी दिसूं लागली. आणि एक दिवस येशी मावशी गळफांस लावून मेली. तिचें प्रेत पाहतांच तिला दिवस गेले होते असें आढळून आलें.

सारा गांव खवळून गेला. पोलिसांत प्रकरण गेलें. ह्या आडवणकरांना गांव सोडून जायला लावलें पाहिजे, जो तो म्हणूं लागला. तें पाहून मुलगा बापावर उलटला. बापाचा सगळा गुन्हां त्यानें पोलिसांना सांगितला, आणि बाबू आडवणकराला हातकड्या पाडल्या.

त्यानंतर वादळ शांत झालें. बाबू आडवणकराचा मुलगा घाबरून गेला. आणि वठणीवर आला. बायकोला तो नीट वागवूं लागला. आपल्या बहिणीला त्यानें जरबेंत ठेवलें. त्याला एक मूल झालें. गांवावरचा आडवणकररूपी शाप गेला असें सगळ्यांना वाटूं लागलें.

आणि तोंच गणपतचें दुकान जाळल्याबद्दल तुरुंगांत गेलेला बाबू आडवणकराचा पोर परत दत्त म्हणून गांवांत येऊन हजर झाला.



# माणसाचें दुःख : : ३

वसंतराव अंथरुणांत तळमळत होते. पश्चात्तापानें त्यांचें हृदय दग्ध झालें होतें ! रात्रीं ते अर्वाचित जागे झाले आणि हा प्रकार घडला, एकदम त्यांना आठवण झाली कीं, आपण आपली आई मरणाच्या दारांत असतांना तिची नीट शुश्रुषा केली नाहीं. तिच्याकडे दुर्लक्ष केलें. खुशाल सिनेमा पाहिले. एकदां तर—छे, छे, नको ती आठवण--एकदां तर आईनें त्यांना डाळिंब आणायला सांगितलें होतें. डाळिंब तें काय ? आठ आण्यांची वस्तू ! पण वसंतरावांनीं तें आणलें नव्हते. आई डाळिंब खाल्ल्याशिवाय अखेर मेली.

अरेरे ! नीचा, अधमाधमा ! काय केलेंस तूं हें ?

आई जिवंत असती तर ? तिच्यापुढें नाक घासलें असतें. फडाफडा तोंडांत मारून घेतल्या असत्या, पण----

ह्याहून अधिक दुःख करणें वसंतरावांना झेपण्यासारखें नव्हतें. एवढ्यानेंच त्यांचें डोकें भणभणूं लागलें होतें. त्यांनीं आपल्या बायकोला उठवलें, आणि आपल्याला कसेंसें वाटत असल्याचें सांगितलें.

सरलाबाई म्हणाल्या, "पित्त झालं असेल तुम्हांला. गेले तीन दिवस नाहींतरी फारच दगदग झाली."

वसंतराव खिन्नपणानें हंसले आणि त्यांनीं मान हलवली.

पण सरलाबाई म्हणाल्या, "मला सगळं माहीत आहे; मी लिंबाचा रस देते तो मुकाट्यानं घ्या. आणि स्वस्थ निजा."

आपल्या खुळ्या बायकोच्या समाधानार्थ वसंतरावांनीं लिंबाचा रस घेतला. आणि काय आश्चर्य ! त्यांच्या दुःखाचा भार कमी झाला आणि पंधरा मिनिटांत त्यांना गाढ झोंप लागली.

सकाळीं जागे होऊन डोळे मिचमिचावित असतांना त्यांना एकदम प्रश्न पडला कीं, आपल्याला झोंप लागली कशी ? आपण पश्चातापानें पोळलेले होतों ना ?

म्हणजे ! लिंबाच्या रसामुळें कीं काय ?

छे, छे ! अतिशय दुःख झालें म्हणजे देखील माणसाला झोंप येते !

तेवढ्यांत सरलाबाई तेथें येऊन म्हणाल्या, " ऐकलं का ? तळमजल्यावरच्या एका बाईनं आत्महत्त्या केली !"

"काय म्हणतेस ?" वसंतराव ओरडले.

" म्हटलं, परवां गणपतराव वारले ना, त्यांच्या बायकोनं जीव दिलान् हो "

" अग पण तो गणपतराव दारूवर आणि रेसवर सगळे पैसे उडवीत असे ना ?"

" हो ना! पण कांहीं झालं तरी नवरा होता ना तो!"सरलाबाईनीं स्पष्टीकरण केलें.

" अरे लेको !" वसंतराव उद्गारले आणि आपण कधीं फार दुःख करायचें नाहीं असें त्यांनीं ठरवलें. हो ! नाहींतर फट्‌दिशीं आत्महत्त्या व्हायची हातून !

ह्या चमत्कारिक भीतीच्या धसक्यानें वसंतराव त्या सकाळीं आनंदी रहाण्याचा प्रयत्न नकळत करूं लागले. आणि आठ वाजायच्या सुमारास त्यांनीं ठरवलें कीं, आजचा दिवस अगदी चैनींत घालवायचा. चैन करायची म्हणून त्यांनीं सिगरेट्‌ पेटवली, आणि तंगड्या पसरून ते आराम-खुर्चींत बसले. ते एक गाणेंदेखील गुणगुणूं लागले.

पण तेवढ्यांत त्यांना आठवण झाली कीं,आपल्याला दाढी करायची

आहे. एकदां वाटलें कीं, मारूं या चाट एक दिवस दाढीला. पण लगेच विचार आला कीं, बाकी आळशीपणा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. नेहमींचीं कामें व्यवस्थितपणें उरकणेंच बरें.

दाढी झाल्यावर त्यांना घड्याळाला चावी देण्याची आठवण झाली. नंतर फळीवरची जुन्या पुस्तकांची बॅग झाडणें आवश्यक ठरलें. नंतर कपडे वॉशिंग कंपनींत टाकायचे फार दिवस राहिल्याचें स्मरणांत आलें.

तेवढ्यांत सरलाबाई म्हणाल्या, " एवढें बाहेर जाताय, तर जरा मिरच्या, कोथिंबीर आणि फुलांची पुडी आणणार का ? "

वसंतराव खेंकसले, " काय बुवा कटकट तुझी ! पांच मिनिटं चैनींत स्वस्थ बसेन म्हटलं, तर तेंही करूं द्यायची नाहींस."

सरलाबाई हंसूं दाबून म्हणाल्या, " बरं, नका आणूं. मीं सांगत्ये शेजारच्या दामूला."

" येवढ्या तेवढ्या कामाला दामू कशाला हवा आहे ? " वसंतराव आणखीनच चिडून म्हणाले, आणि त्यांनीं मिरच्या, कोथिंबीर आणि फुलांची पुडी आणली.

फुलें विकणारा म्हातारा माळी परत परत पैसे मोजून पहात होता आणि माना हलवून शिव्या देत होता. वसंतरावांनीं आश्चर्यानें त्या माळ्याच्या मुलाला विचारलें, " काय रे ? असं काय करतोय हा ? "

मुलगा हंसत हंसत म्हणाला, " कांहीं नाहीं साहेब. डोकं फिरलय म्हाताऱ्याचं. त्याला सारखं वाटतं कीं, आपल्या पेटींतले पैसे कोणीतरी आपल्याला फसवून नेले. "

वसंतरावांना धसकाच बसला. आपल्या हातांत पैसे किती शिल्लक आहेत तें पहाण्याचा धीर त्यांना होईना. आणि ते किती आहेत ह्याचा मनांत पुन्हां पुन्हां होणारा हिशेब थांबवतां येईना.

घरीं आल्यावर ते वैतागून खेंकसले, " सारखं काम ! मिनिटभर

फुरसत नाहीं. कधीं स्वस्थपणें बसेन म्हटलं तर तें व्हायचं नाहीं."

अंघोळ केली म्हणजे मनांतलीं विचारांचीं कोळिष्टकें सारीं झाडलीं जातात आणि विनोद करावा असें वाटूं लागतें.

वसंतराव विनोद करण्याच्या उद्देशानें सरलाबाईंना म्हणाले, " काय ग ? तुझ्या वडिलांनीं काळा बाजार करून किती पैसे मिळवले गेल्या वर्षात ? एक घर तरी बांधून झालें असेल ? "

सरलाबाई म्हणाल्या, " मला नाहीं माहीत. "

" बाकी एवढें पैसे मिळवतोय म्हातारा आपल्या कापडाच्या दुकानावर. पण जांवयाला कांहीं द्यावं असं कांहीं मनांत येत नाहीं ! "

" जांवयाचं जेवढं करायचं तेवढं करून झालंय. " सरलाबाई संयमानें म्हणाल्या.

" काय केलंय् ग ? अं ? रेडिओ घेऊन दिलाय मला कीं मोटर सायकल घेऊन दिली आहे ? "

" आतां कशाला बोलूं उगाच मी ? शब्दानं शब्द मात्र वाढतो. "

वसंतराव एकदम चिडले. आपल्या बायकोच्या ह्या संयमाचाच त्यांना विलक्षण संताप येत असे. कारण त्या संयमामुळें नैतिक विजय नेहेमीं तिचाच होत असे. आणि मनुष्य हा इतका नैतिक प्राणी आहे कीं, दुसऱ्याचा नैतिक विजय त्याला कधींच सहन होत नाहीं.

वसंतराव ओरडले, " बोलत कां नाहींस ? बोल ना, बोल. तुझ्या वडिलांच्या वशिल्यानं मला नोकरी लागली; असंच ना तुला म्हणायचंय् ? मग म्हणून घे एकदां. किती करायचा असेल तितका पाणउतारा करून घे. पण मला नोकरीचीही पर्वा नाहीं, आणि तुझीही पर्वा नाहीं. आपल्या बापाच्या घरीं तूं निघून जा. आणि मी पण जातों कुठंतरी."

ह्या अपमानानें वसंतरावांना इतकें तीव्र दुःख झालें कीं, त्यांचा गळा दाटून आला.

सरलाबाई मृदु स्वरांत म्हणाल्या,"पण मी काहींतरी बोलल्ये कां बरं आतां ? "

" नाहीं. तुझी कांहींच चुकी नाहीं. सगळी चुकी माझीच आहे. मीच गाढव आहे, मूर्ख आहे, हलकट आहे." आणि अगदीं कातावून दाणदाण पाय आपटीत ते बाहेर निघून गेले.

जग किती दुष्ट आहे आणि आपल्या हृदयाला यातना करण्यांत जगाला कसा आनंद वाटतो ह्याचा वसंतराव उदासीनपणें विचार करीत होते. त्यांच्या डोळ्यांतून असाह्यतेचे दोन अश्रूदेखील ओघळले.

थोड्या वेळानें सरलाबाई बाहेर आल्या, आणि त्यांच्या कपाळा-वरून हात फिरवीत म्हणाल्या, " जेवायला चलायचं ना ? "

" नको मला जेवायला उपाशीं मेलों म्हणून कोणाचं काय वाईट होणार आहे ? " वसंतराव अर्धवट खिन्नतेनें आणि अर्धवट तिरसटपणानें म्हणाले.

" छे, असं नाहीं वेड्यासारखं करायचं. " आणि सरलाबाईंनीं वसंतरावांचा हात धरून त्यांना पाटावर नेऊन बसवलें. वसंतरावही लहान मुलांसारखे त्यांच्या मागोमाग गेले.

जेवण झाल्यावर सरलाबाईंनीं दिलेली सुपारी खातांना वसंतराव खिडकींतून बाहेर पहात म्हणाले, " बाकी, उगीचच ओरडलों नाहीं मी मगाशीं तुझ्यावर ? राग आला असेल नाहीं तुला माझा ? "

सरलाबाई हंसून म्हणाल्या, " इश्श ! रागवायचं कसलं त्यांत ! भुकेची वेळ असली म्हणजे मनुष्य असाच आकस्तळेपणा करतो."

सरलाबाईंच्या त्या उत्तरानें वसंतराव सर्दच झाले. आणि भरल्या पोटीं जितका राग आणतां येईल तेवढा आणून ते म्हणाले, " म्हणजे ? मला कुक्कुलं बाळ समजतेस कीं काय तूं ?"

थोड्या वेळानें वसंतराव कपडे घालून ऑफिसांत जायला निघाले. जातांना त्यांनीं स्वयंपाकघरांत डोकावून पाहिलें तों सरलाबाई पदराच्या टोकानें डोळे पुशीत होत्या. तें पाहून वसंतराव गांगरले. सरलाबाईंच्या जवळ जाऊन ते म्हणाले," काय झालं ग ? मीं बोललों म्हणून का ? अं ?

माझा कीं नाहीं, स्वतःवर ताबा राहात नाहीं !"

सरलाबाई हंसून म्हणाल्या," छे! छे! तुमच्यावर कसलं रागवायचं? उगीचच आपलं डोळ्यांतून पाणी आलं माझ्या. "

" तरी पण—सांग ना !" वसंतराव काकुळतीला येऊन म्हणाले. आणि त्यांना कांहींशी चीड आली. बायको स्वतःचीं दुःखें आपल्याला कधींही सांगत नाहीं, हें त्यांना अपमानास्पद वाटलें.

शेवटीं सरलाबाई म्हणाल्या, " सांगू का ? तुम्हीं आतां कुक्कुलं बाळ असं म्हटलंत ना, त्यावरून मला गेल्या वर्षीं आपली मुलगी गेली त्याची आठवण झाली ! "

आणि एकदम वसंतरावांना मिठी मारून त्या ओक्साबोक्शीं रडूं लागल्या.

वसंतराव स्टेशनवर गेले; तेव्हां आगगाडी नुक्तीच सुटली होती. धांवती गाडी पकडण्याचा मोह त्यांना झाला; थोडेसें ते धांवले देखील. पण त्यांनीं तो मोह आवरला.

तेवढ्यांत दुसरा एक मनुष्य गाडी पकडण्याकरितां धांवूं लागला. त्याचा मित्र ओरडून म्हणाला, " अरे, अरे. नको उगीच ! " पण तो मनुष्य अर्धवट मागें वळून हंसत म्हणाला, " डोळ्यापुढं दिसणारी गाडी सोडून द्यायची म्हणजे काय ! चल, ये तूं पण "

त्यानें धांवत्या गाडीच्या दरवाजाची कडी पकडली आणि तो आंत पाऊल टाकणार इतक्यांत एका गुळगुळीत दगडावरून त्याचा पाय सरकला, आणि तो एकदम गाडीखालीं गेला.

वसंतरावांनीं डोळे घट्ट मिटून घेतले, आणि एका खांबाचा आधार घेऊन ते उभे राहिले.

सारा गलका कमी झाल्यावर त्यांनीं एकाला विचारलं, " काय झालं ? काय झालं ? "

" कांहीं नाहीं. दोन्ही पाय तुटले."

दुसरा एक माणूस असाच प्लॅटफॉर्मच्या खालीं गेला होता. पण रूळाच्या आणि फलाटाच्या फटींत पडून तो वांचला."

" बी. बी. सी. आय च्या लाईनवर असं कांहीं होत नाहीं. त्या गाड्यांचे फुटबोर्ड इतके उंच नाहींत. "

" चांगलाच उशीर झाला ऑफिसांत जायला. "

गाडींत बसल्यावर त्यांनीं वर्तमानपत्र वाचायला सुरवात केली. एका बंधमुक्त राजबंद्याची मुलाखत होती. तुरुंगांतल्या हालांमुळें त्याची प्रकृति पार ढांसळली होती. तुरुंगांत त्याला अनेक दिवस झोपायलाच देण्यांत आलें नव्हतें. दंडुक्यांनीं मारून मारून त्याच्या बरगड्या ठेंचल्या गेल्या होत्या. भिंतीवर दाणदिशीं डोकें हापटण्यांत आलें होतें.

पण तो हंसून इतकेंच म्हणाला होता, " देशसेवकांच्या नशिबीं ह्या यातना नेहमींच लिहिलेल्या असतात. पण मला इतकंच वाईट वाटतं आहे कीं, आतां मला देशाची अधिक सेवा करतां यायची नाहीं. मीं असाच जन्मभर लुळापांगळा रहाणार. पण माझीं प्रामाणिक मतं मीं सोडलीं नाहींत, हें काय थोडं झालं ? "

प्रामाणिक मतें—प्रामाणिक मतें ! ते शब्द वसंतरावांच्या कानांत सारखे घुमत राहिले.

त्यांना वाटूं लागलें कीं, आपला पिंड खरा देशसेवकाचाच आहे. एखाद्या दिवशीं हें क्षुद्र जीवित आपल्याला असह्य होईल. आणि मग फाउंटनपेन, घड्याळ, खिशांतलें पाकीट, कोट, सारें दिसेल त्या गरिबाला आपण देऊन टाकूं; आणि एका शर्टानिशीं आपण देशसेवेचा मार्ग पत्करूं.

मग पोटापाण्याची आपल्याला पर्वा वाटणार नाहीं. बायको ढसढसा रडली तरी आपण तिकडे ढुंकूनदेखील पहाणार नाहीं. फक्त आपली प्रामाणिक मतें आणि आपण !

प्रामाणिक मतें ! प्रामाणिक मतें !

वसंतराव प्रामाणिकपणें ऑफिसपर्यंत चालत गेले. प्रामाणिकपणें त्यांनीं कोट खुर्चीच्या पाठीवर ठेवला. प्रामाणिकपणें खण उघडून त्यांनीं टांक बाहेर काढले. आणि प्रामाणिकपणें ते काम करूं लागले.

तेवढ्यांत त्यांचे ऑफिसांतले मित्र त्यांच्याभोंवतीं जमले. आणि त्यांनीं बातमी सांगितली कीं, विनायकराव फडके आतां ऑफिसर झाले. एकदम त्यांना प्रमोशन मिळालें.

साऱ्या लोकांनीं विनायकरावांची स्तुती केली. त्यांना हुषार म्हटलें, चलाख म्हटलें. तेव्हां वसंतरावांनीं कपाळावर आंठ्या चढवून प्रामाणिकपणानें म्हटलें, " कशाला उगाचि स्तुती करतात त्या मूर्खाची. मॅनेजरला पोरी पुरवायचं काम करून--"

विनायकरावांच्या तिखट कानांपर्यंत ही बातमी लवकर पोहोंचली. थोड्या वेळानें फडक्यांच्याकडून त्यांना बोलावणें आलें.

" काय हो जोशी, तुम्हीं तें स्टेटमेंट तयार केलंत का ? "

" नाहीं बुवा. व्हायचं आहे अजून. "

" पंधरा तारखेला तें द्यायचं होतं ना ? आज एकवीस तारीख आली. असा गैरशिस्तपणा कसा चालेल ? "

" माझा गैरशिस्तपणा ह्यांत कांहीं नाहीं. खरं म्हटलं म्हणजे हें धैसासांचं काम. पण ते रजेवर आहेत म्हणून माझ्या गळ्यांत पडलं आहे. त्यांनीं सगळा घोटाळा करून ठेवला आहे, त्याला मीं काय करणार ! "

"This is no argument ! ऑफिसचं सगळं काम हें स्वतःचंच काम समजलं पाहिजे. सध्यां कामाचा चार्ज तुमच्याकडे आहे ना ? मग जबाबदारी तुमचीच आहे. आज लेट बसून तें काम करून टाका."

" पण..."

" No argument ! नाहींतर रिपोर्ट करावा लागेल मला. " विनायकराव कडाडले. दाराला कान लावून ऐकणारा शिपाई पळाला.

वसंतराव जाग्यावर आले ते चवताळूनच. त्या रागाच्या भरांत त्यांनीं शेजारच्या खुर्चीवर बसणाऱ्या माणसाशीं भांडण केलें. आणि मग त्यांना अधिकच कटु आणि एकाकी वाटूं लागलें.

ते घाबरून गेले, गोंधळले. त्यांना आपल्या प्रमोशनविषयीं धास्ती वाटूं लागली. नोकरी जाईल कीं काय ह्या कल्पनेनें त्यांचीं आतडीं पिळवटलीं. किती तरी वेळ ते डोकें टेबलावर टेकून बसले. आणि मग शेवटीं पडलेल्या चेहऱ्यानें ते परत फडक्यांच्या खोलींत गेले. अजीजीच्या स्वरानें काहींसे बोलले.

फडके आपल्या कामाच्याच नादांत म्हणाले, " No. No. No. No....."

" पण..."

" Please get out ! " फडके खेंकसले.

Get out. Get out ! विजेचा धक्काच वसंतरावांना बसला. ह्या दीडदमडीच्या फडक्यानें Get out म्हणावें अं ? ते बाहेर आले, तेव्हां दोन तीन टाइपिस्ट पोरी हसतांना त्यांना दिसल्या. वसंतरावांना वाटलें कीं, त्या आपल्यालाच हंसत आहेत. त्यांचें मस्तक भडकलें. ते स्वतःशींच ओरडले, " प्राण गेला तरी हरकत नाहीं. पण गुलामगिरी नको. कोकणांतल्या घरांत जाऊन राहीन. मीठभाकर खाईन..." त्यांनीं रागारागानें राजीनामा खरडला आणि तावातावानें ते तो मॅनेजरकडे घेऊन गेले.

मॅनेजरनें तो वाचला, आणि हंसत हंसत फाडून टाकला. तो बेरकी म्हातारा म्हणाला, " हें पहा मिस्टर जोशी, तुम्हांला वेडबिड लागलंय कीं काय ? तुम्ही एक तर बसूं नकाच, पण उद्यांचा दिवस रजा घ्या. आणि परवां या कामावर. Smiling and happy अं ? "

आणि झालें. वसंतरावांना आपण फार मूर्खपणा केला, हें अगदीं पटलें. मॅनेजरच्या शहाणपणाचें कौतुक वाटूं लागलें. ऑफिसांत आपलें फार

महत्त्व आहे अशा जाणिवेनें त्यांना गुदगुल्या होऊं लागल्या. गुलामगिरी, कोकणांतलें घर वगैरे मूर्ख कल्पना त्यांच्या डोक्यांतून पळून गेल्या. त्यांची वृत्ती फुलासारखी हलकी झाली.

आणि परत प्रामाणिकपणा वगैरे गोष्टींच्या वाटेला न जाण्याचें त्यांनीं धूर्तपणानें ठरवलें. मॅनेजरची मर्जी संभाळण्याकरितां ऑफिसचें काम अगदीं मन लावून करायचें ठरवलें.

त्यांना कळत नव्हतें कीं, आतां परत कधीं असा राजीनामा मॅनेजरकडे घेऊन जायची छाती झाली नसती, कीं ह्यापुढचे अपमान त्यांना तसेच गिळून टाकावे लागले असते.

वसंतराव ऑफिस सुटल्यावर गाणें गुणगुणत स्टेशनवर आले. तेथें त्यांना आपले म्हातारे काका भेटले. वसंतरावांना ते म्हणाले, " अरे- किती हांका मारल्या वसंता, मी तुला ! बाकी तूं काय आतां मोठा पगारवाला झालास म्हणा !"

" अहो, कसला पगार काका ! पोटाकरितां म्हारकी करायची !"

" तें खरंच. पण आतां दीडशेंच्या घरांत असशील ना तूं ? " काकांनीं हावरेपणानें विचारलें.

" नाहीं, दोनशें."

काकांचा चेहरा आंबट झाला. आणि ते किरकिरत म्हणाले, " बाकी आतां काय, वाटेल तसे पगार मिळतात. आमच्या वेळीं एम्. ए. सुद्धां साठ रुपयांवर काम करीत असत."

वसंतरावांना काकांची फार गंमत वाटली. माणसें किती क्षुद्र असतात पहा, ते प्रौढपणानें स्वताशींच म्हणाले. मग ते काकांना म्हणाले, " काय काका, तुमच्या वासूचं कसं काय ठीक चाललं आहे ना ?"

काकांचा चेहरा एकदम पडला, " होय, बेश आहे. पण आतां तो मला आणि आपल्या आईला सांगतोय कीं, तुम्ही इथं माझ्या घरीं राहूं नका, कोकणांत जाऊन रहा. आतां ह्या उतारवयांत आम्हीं कुठं रे

एकटीं तिकडे जंगलांत रहाणार ? पण ह्या जगांत कोणी कोणाचं नाहीं. कोणीं कोणाचं नाहीं !" आणि मान हलवीत ते निघून गेले.

वसंतरावांना आठवलें कीं, आपल्या लाडक्या वासूला कडेवर घेऊन घेऊन त्याच्या आईच्या हाताचें हाड सरकलें होतें. आणि मग एकदम सकाळीं आपल्याला मिठी मारून रडणाऱ्या सरलाबाईची त्यांना उत्कटतेनें आठवण झाली.

ते गाडींत बसले. त्यांच्या शेजारीं त्यांच्या ऑफिसांतली टायपिस्ट बसली होती. तिनें एकदम विचारलें, " तुम्हीं फडक्यांना पाहिलं काय ? "

" अं: ते त्या मिस् मंगीबरोबर गेले, असं वाटतं बुवा. " वसंतराव एकदम बोलून गेले.

त्या मुलीचा चेहरा खर्रकन् उतरला. ती एकदम पुटपुटली " I hate him."

असें ती कितीदां म्हणाली असेल. पण फडक्यांनीं तिच्याकडे पाहून नुसतें हास्य केलें कीं, शेपूट हलवीत पुढें होणाऱ्या कुत्र्याप्रमाणें ती त्यांच्याकडे जात असे. ह्यावर तिचा कांहींच इलाज चालत नव्हता.

वसंतरावांना तिची कींव वाटली. आणि अधिकच उत्कटतेनें त्यांचें मन सरलाबाईकडे धांवलें.

पूल ओलांडून ते घाईनें घराकडे चालले. वाटेंत भीक मागण्याकरितां बसविलेलें एक मूल तसेंच एक हात पुढें पसरून झोपीं गेलें होतें.

वसंतराव घरीं गेले; तेव्हां सरलाबाई शेजारणीशीं कांहींतरी हलक्या आवाजांत बोलत होत्या. वसंतराव येतांच शेजारीण उठून गेली.

वसंतराव म्हणाले, " काय ग ? काय चाललं होतं खलबत ? "

सरलाबाई हंसून म्हणाल्या, " इश्श ! कुठं काय ! आमचं आपलं बायकांचं बोलणं. थांबा, आधीं चहा करतें. "

सरलाबाईंना काय सांगण्याकरितां आपण इतके धांवत आलों तें वसंतरावांना आठवेना. त्यामुळें ते रागावले, चडफडले.

खरें म्हटलें, म्हणजे त्यांना सांगायचें होतें तें अगदीं सोपें होतें. त्यांना प्रेम व्यक्त करायचें होतें. पण बहुतेक माणसें इतकीं भेकड असतात कीं त्यांना ही साधी सुंदर भावना व्यक्त करतां येत नाहीं.

तेवढ्यांत सरलाबाई म्हणाल्या, " अगबाई, पूड संपली वाटतं ! थांबा हं. मीं शेजारच्या दामूला आणायला सांगतें. "

वसंतराव एकदम उसळले, " शेजारचा दामू कशाला हवा आहे ज्या त्या कामाला ? तूं मला कां कांहीं काम सांगत नाहींस ? माझी तुला कांहींच किंमत वाटत नाहीं ! तुला वाटतं कीं, मीं मूर्ख आहे. म्हणून तूं मला कधीं कांहीं सांगत नाहींस; विचारत नाहींस ! "

सरलाबाई आश्चर्यानें म्हणाल्या, " अग बाई ! पण तुम्ही दमून आलांत म्हणून... "

" कोणी सांगितलं मीं दमलोंय म्हणून ? "

" मग आणा तुम्हींच पूड. "

" नाहीं मीं आणणार. "

सरलाबाई गप्प बसल्या.

त्यामुळें वसंतराव अधिकच उसळून म्हणाले, " आज सिनेमाला तरी येणार आहेस कीं नाहीं माझ्याबरोबर ? कीं कांहीं तरी खोटी सबब सांगणार आहेस परत ? "

सरलाबाई हंसल्या, आणि त्यांनीं वसंतरावांच्या मस्तकाचीं चुंबनें घेतलीं.

वसंतराव खुलले. लहान मुलासारखे ! आतां अगदीं चैनींत आरामखुर्चींत पडून रहायचें.

पण त्यांच्या डोक्यांत चिंतेचें काहूर उठलें कीं. आतां हिंदुस्थानांत दुष्काळ पडणार आहे कीं काय ?

● ● ●

# उंट आणि लंबक : : ४

दिवाणखान्यांतल्या कोचावर बसून कृष्णाबाई आपल्या नवऱ्याच्या कोटाचें तुटलेलें बटण लावीत होत्या. त्यांचें वय सुमारें पस्तीस वर्षांचें होतें; आणि तरी त्यांची उमेद कांहीं ओसरली नव्हती. पूर्णपणें विकासित झालेलें त्यांचें सौंदर्य चांगलें टवटवीत होतें. त्यांच्या धीट जाणत्या नजरेंत अजून मादकता तरळत होती. त्यांच्या चेहेऱ्यावर विचारांची व भावनांची अधीरी, उत्कट आणि भित्री धावपळ नव्हती. त्यांच्या रेखीव चेहेऱ्यावर उमटणारे भाव परिपक्व आणि संयमित होते. दुसऱ्याला न दुखविणारा गोड आत्मविश्वास त्यांचा चेहेरा उजळीत होता. त्यांच्या हनुवटींतला कठोर आग्रह त्यांचें आर्जवी हास्य छपवीत असे. त्यांचे पुष्ट स्तन आणि भरलेला नितंबभाग अभिमानानें सांगत होते, कीं पुरुषाला जें सुख स्त्रीनें द्यायचें तें कृष्णाबाईनीं आपल्या पतीला पुरेपूर दिलें होतें. उन्मादाच्या शिखरावर त्याला नेलें होतें. मग निश्चल तृप्तीच्या डोहांत त्याला तरंगत ठेवलें होतें. त्यांची कूस पुन्हा पुन्हा उजवली होती आणि अजून पुष्कळ दिवस पतीच्या जळत्या अतृप्तीचें समाधान त्या करणार होत्या. अजून त्यांची कूस पतीचें बीज पुन्हा पुन्हा पोसायला समर्थ होती नव्हे उत्सुक होती.

कृष्णाबाई आपल्या नवऱ्याच्या कोटाचें तुटलेलें बटण लावीत होत्या. त्यांच्यासमोर एक तरुण बसला होता. असेल वीस बावीस वर्षांचा. रघुनाथरावांचा तो दूरचा नातेवाईक. नुकताच बाहेर गावांहून आला होता कांहीं निमित्तानें. चार दिवस राहणार होता.

अस्वस्थपणें तो आपल्या शर्टच्या बटणाशीं चाळा करीत होता. तो गोरटेला होता. त्याचें शरीर कोवळें होतें. छाती रुंद होती. कंबर निमुळती होती. चेहरा अजून जसाच्या तसा पोरकट होता. अजून त्याच्यावर प्रौढपणाचे कसलेच संस्कार झाले नव्हते. अस्पष्ट, उत्कट, बुजरे भाव त्याच्या चेहऱ्यावर गर्दी करीत आणि त्यामुळें तो सारखा गोंधळलेला दिसे. त्याचे लाजरे डोळे स्वप्नांच्या द्रवानें भरलेले होते. अस्वस्थता त्याला सारखी ओरबाडत होती. काय हवें म्हणून तो स्वतःलाच विचारीत होता; आणि स्वप्नांचे इमले रचीत होता. महत्त्वाकांक्षा त्याला ढोसकत होती. पण पुढें पाऊल टाकायचा त्याला आत्मविश्वास नव्हता. त्याच्या कृश मनगटावर लव दाटली होती.

कृष्णाबाई त्याला कसले तरी मामुली प्रश्न विचारीत होत्या. त्यांना उत्तरें शोधण्यासाठीं तो चांचपडत होता. आणि चोरटेपणानें तो पुन्हा पुन्हा कृष्णाबाईच्या उन्मादक सौंदर्याकडे पाहात होता. सुंदर स्त्री पाहिली की त्याचें शरीर तापून विकल होत असे, कल्पना भडकत असे आणि नजर चोरटे खेळ खेळत असे.

अवाचितपणें कृष्णाबाईचें लक्ष त्याच्या नजरेच्या चोरट्या खेळाकडे गेलें. त्यांना आश्चर्य वाटलें, थोडी गंमतहि वाटली. आपल्या शांत धीट नजरेनें त्यांनी त्याला नीट न्याहाळलें. त्याच्या कृश मनगटावरची लव पाहून त्यांना दया आली. त्याच्या चेहेऱ्यावरचा गोंधळ पाहून त्यांना हसूं आलें. धीटपणें त्यांनीं सरळ त्याच्या डोळ्यांत पाहिलें आणि पाहतां पाहतां त्या नव्या उसळणाऱ्या कामवासनचें आव्हान त्यांच्या शरीरानें स्वीकारलें. त्यांच्या नजरेंतील तरळती मादकता बाहेर सांडली आणि अविनाश तिच्यांत होरपळला. त्याचा चेहेरा फुलला आणि एक तरल भाषा बोलूं लागला. त्यांनीं पुन्हा पुन्हा दीर्घ श्वास घेतला. उष्ण रक्ताचा प्रवाह त्याच्या मस्तकाकडे धावूं लागला. पोट रिकामें रिकामें झालें.

कृष्णाबाई कांहींशा खजील झाल्या. त्यांना गंमत वाटली आणि आश्चर्यहि वाटलें. आपली नजर त्यांनीं शिवणकामाकडे वळवली. पदर

सांवरला. उगीचच एकदां केसांवरून हात फिरवला. विचारांचा एक घोळका त्यांच्या मनांतून धांवला.

आज इतकीं वर्षे खपून त्यांनीं आपल्या संसाराची उभारणी केली होती. एक सुंदर भावाकृती प्रीतीच्या रेशमी धाग्यांनीं गुंफली होती. रघुनाथराव इंजिनीअर होते· आणि मोठ्या पगाराच्या नोकरीवर होते. त्यांना तीन चुणचुणीत मुलें होतीं. ह्या साऱ्या माणसांचें त्यांनीं एक कुटुंब बनवलें होतें साऱ्यांच्या वृत्तींना अवश्य तीं वळणें दिलीं होतीं. नवऱ्याच्या एककल्ली बुद्धिमत्तेला थोडी शहाणपणाची आणि थोडी स्निग्ध-वृत्तीची जोड दिली होती. क्रिकेट खेळण्यांत मग्न असणाऱ्या हूड विश्वासच्या मनांत समंजसपणाचें बीं पेरलें होतें. हळव्या सुषमेच्या वृत्तींत खेळकरपणा फुलवला होता. धाकट्या प्रकाशच्या हट्टीपणाला नादिष्टपणाचें स्वरूप दिलें होतें आणि अनेक सूक्ष्म बंधनांनीं त्यांनीं ·सर्वांना घट्ट एकत्र बांधून टाकलें होतें.

त्यांच्या प्रयत्नांमुळें रघुनाथराव बंदूक घेऊन हौशीनें शिकारीला जात. विश्वासला फोटोग्रॅफीचा छंद जडला होता. सुषमा गात असे. प्रत्येकाच्या वृत्तींतल्या नव्या नव्या .कळ्या उमलत होत्या. त्या साऱ्याच माणसांत आत्मविश्वास निर्माण झाला होता, प्रसन्नता फुलली होती.

आप्त, मित्र, परिचित ह्यांचे स्नेहसंबंध त्यांनीं आपल्या संसाराच्या भावाकृतींशीं जोडून टाकले होते. आणि त्यामुळें आपल्या संसाराला अधिकच स्थिरता आणि बळकटी आणली होती.

आपलें सारें जीवन त्यांनीं ह्याच्यांतच वेचलें होतें. हीच त्यांच्या जीवनाची फलनिष्पत्ति होती. हेंच त्यांच्या जीवनाचें सार्थक होतें.

हें सारें संपन्न आणि सुसंस्कृत कौटुंबिक जीवन त्यांनीं निर्माण केलें होतें. तें जीवन त्यांचें होतें, आणि कृष्णाबाईंना त्या जीवनावेगळें अस्तित्व नव्हतें.

आणि तरी त्यांच्या मनानें अचानक असा उठवळपणा केला होता.

क्षणभर कां होईना हें सारें सोडून एका भगभगत्या भडकत्या ज्वालेवर झेप घ्यायला त्या तयार झाल्या होत्या, उत्सुक झाल्या होत्या. ह्या जीवना-विषयींची त्यांची मनांतली सारी आसक्ति जणू मेली होती.

खरोखर ह्या गोष्टीचें कृष्णाबाईना विशेष आश्चर्य वाटायला नको होतें. माणसाचें मन असेंच अचपळ आणि उठवळ असतें. पण माणूस त्याला नेहेमीं विवेकाचा लगाम घालतो आणि मग त्याचें जीवन सुरळितपणें चालतें. कृष्णाबाईना हें माहीत नव्हतें अशांतला भाग नाहीं. पण हा त्यांचा असा पहिलाच अनुभव नव्हता. अनेकदां असा त्यांना अनुभव आला होता. त्या एकट्या असल्या, विचार करूं लागल्या कीं, त्यांना ह्या सर्व जीवनाविषयीं परकेपणा वाटूं लागायचा. असें वाटायचें, की पुरे झाला हा खेळ; आतां ह्यांत फार वेळ गेला, हा खेळ उधळून टाकावा आणि चालायला लागावें ? कुठें ? कुठं जायचं तें त्यांना माहीत नव्हतें आणि तरी आपल्याला पक्कें माहीत आहे असें त्यांना वाटत असे.

असले विचार मनांत येऊं लागले कीं त्या स्वतःला कामांत गुंतवून घेत. आतांहि त्यांनीं असेंच केलें. हातांतलें काम त्यांनीं पुरें केलें आणि रघुनाथरावांची घरीं यायची वेळ झाली म्हणून त्या उठून चहा करण्याकारितां घरांत गेल्या.

आणि इकडे अविनाश मात्र कृष्णाबाईच्या डोळ्यांतून सांडलेल्या मादकतेंत होरपळत राहिला. त्याच्या क्षुब्ध मनांत अनेक प्रचंड अर्थ-शून्य वादळें निर्माण झालीं, त्याला वाटलें कीं संसारांत कोंडलेल्या साऱ्या स्त्रियांना मोकळें करावें. आणि क्षुब्ध, उदात्त, विकृत अशा कामवासनेच्या आगीचा डोंब पेटवून द्यावा. कणाकणानें संपत्ति गोळा करणाऱ्या यांत्रिक माणसांना चाबकानें फोडून काढावें. त्यांची सारी संपत्ति लुबाडून घ्यावी. आणि त्या चवताळलेल्या लोकांना मोकाट सोडून द्यावें. अन्नाची जरूर लागेल तेव्हां माणसानें शिकार करावी, दुसऱ्याला लुबाडावें आणि विस्तवावर भाजलेलें अर्धेकच्चें मांस खावें. आणि बाकी सारा वेळ त्यानें आकाशाकडे पाहावें, हसावें, नाचावें,

गावें, स्त्रीला कवटाळावें आणि तिच्याकरितां दुसऱ्याशीं लढावें.

त्याला गुदमरल्यासारखें वाटूं लागलें. उठून तो येरझारा घालूं लागला. त्याला वाटलें कीं आपण रघुनाथरावांना युद्धाचें आव्हान द्यावें आणि त्यांच्या मृत शरीरावरून कृष्णाबाईंना टराटरा ओढत घेऊन जावें.

त्याच्या मनांतल्या ह्या मूर्ख वादळाकडे पाहून तो दिवाणखाना शांतपणें, आत्मविश्वासानें स्मित करीत होता.

तो दिवाणखाना चांगला प्रशस्त होता. फर्निचरची रेखीव सौंदर्यपूर्ण मांडणी तेथें केलेली होती. त्याच्या भिंतींचे गडद पण डोळ्यांना न खुपणारे रंग, आणि फर्निचरचें उंची, मंदपणें तकाकणारें काळें पॉलिश ह्यांच्यांतून एक प्रकारची मादक तृप्ती दरवळत होती. तिथल्या खिडक्या-दारांचे पडदे छचोरपणें आणि बेफामपणें फडफडत नव्हते; तर आपल्याच चुणीदार ऐटींत सावकाश पुढेंमागें रुळत होते. झगझगत्या डोळ्यांत खुपणाऱ्या आणि मस्तक तापवणाऱ्या सूर्यप्रकाशाला तेथें वाव नव्हता. कांचांतून आणि पडद्यांतून झिरपणारा, खोलींतल्या वस्तूंच्या रंगांनीं मंद आणि सुखदायक केलेला प्रकाश तिथें पसरला होता. आणि तिथल्या भल्या मोठ्या घड्याळाचा भारदस्त लंबक कालाच्या दाराशीं नेमक्या येरझाऱ्या घालीत, आल्यागेल्या मिनिटांची नोंद दक्षतेनें ठेवित होता.

अविनाशाला वाटलें की ही खोली, हें घर, हा संसार हीं सारीं छिन्नविछिन्न करून टाकावीं. जोरजोरांत तो येरझारा घालीत होता; आणि आवेशाच्या भरांत त्यानें एक खिडकी धाड्दिशी उघडून टाकली. तरी तो दिवाणखाना तसाच शांत आत्मविश्वासानें स्मित करीत होता. अवि-नाशचा आवेश ओसरला. त्याचें क्षुब्ध मन आता निपचित पडलें, तो कावरा–बावरा झाला, घाबरला. आपलें सगळें चुकतें आहे, आपले सारे विचार मूर्खपणाचे आहेत अशी त्याला खात्री पटली. त्याला वाटलें की त्या भल्या मोठ्या घड्याळावरच्या, मूर्खपणें मान हलवणाऱ्या कचकड्याच्या उंटासारखे आपण आहों. क्रूर परमेश्वरानें आपल्याला जीवनांत

विदुषकाची भूमिका दिली आहे. जन्मभर आपली अशी निर्दय थट्टा चालत राहणार. रागारागानें त्यानें त्या परमेश्वराचा, म्हणजे आपल्या हातांतल्या रुमालाचा चोळामोळा केला.

इकडे कृष्णाबाई आपल्या नित्यकामांत गढून गेल्या. थोड्या वेळांनें ऑफिसांतलें काम संपवून रघुनाथराव अधीरपणानें घरीं आले आणि आपली हॅट त्यांनीं कृष्णाबाईच्या अंगावर फेकली. कृष्णाबाईनीं जेव्हां त्यांचे केस कुस्करले तेव्हां त्यांना श्रमपरिहार झाल्यासारखें वाटलें. चमकत्या नजरेनें कृष्णाबाईकडे पाहून तें बडबडूं लागले.

थोड्या वेळानें क्रिकेटच्या क्रीडांगणावरून विश्वास धांवत पळत आला. त्यानें तिथें कांहीं तरी मोठा पराक्रम गाजवला होता. पण आपला पराक्रम जेव्हां त्यानें आईला सांगितला तेव्हांच त्याच्याभोंवतीं अद्भूततेचें वलय निर्माण झालें. सुषमाचें कोमेजलेलें मन आईनें चौकशी करतांच उमललें. आजारी गड्याला गोड शब्दाचें आणि बाटलींतलेंहि औषधपाणी मिळालें. साऱ्या घरांत प्रसन्नता फुलून राहिली.

कृष्णाबाई ह्या सर्व गोष्टींत गढून गेल्या होत्या, आणि तरी त्यांच्या मनाचा कुठचा तरी भाग कठोर होत होता. एक प्रकारच्या तिरसट तिऱ्हाईतपणें त्या आपल्या कौटुंबिक जीवनाकडे पाहात होत्या. त्यांना वाटत होतें घरांतल्या ह्या चार माणसांचे फासे हातांत खुळखुळावून आपण संसाराचा हुकमी डाव टाकला आहे. हींच काय, दुसरीं कोणतींहि माणसें असतीं तरी आपण असाच डाव टाकला असता. आपला संसार असाच यशस्वी झाला असता. आणि हा खेळ आपण चालू ठेवला काय अगर उधळून टाकला काय, त्याला कांहींच अर्थ नाहीं, तें सारें पोकळ, महत्त्वशून्य आहे.

कृष्णाबाईच्या वृत्तींत इतका परकेपणा आला, त्यांचें मन इतकें कठोर झालें कीं त्यांना स्वतःचीच भीति वाटूं लागली.

वेळ झाली तशी सारीं माणसें जेवायला बसलीं. रघुनाथरावांच्या शेजारीं अविनाशचें पान होतें. तो इतका बुजरा होता कीं त्याला हवें नको

देखील नीटपणें म्हणतां येत नव्हतें. कृष्णाबाईंचें लक्ष त्याच्या कृष मनगटाकडे गेलें; त्याच्या स्वप्नाच्या द्रवापासून निर्माण झालेल्या डोळ्यांकडे गेलें; आणि त्यांना कां कोण जाणे, तो अगदीं जवळचा वाटूं लागला. त्यांना वाटलें की ह्याची आणि आपली फार जुनी ओळख आहे.

रघुनाथराव त्याच्याशीं कांहीं तरी मामुली बोलत होते आणि तो त्यांना चांचरत कांहीं तरी उत्तरें देत होता. एखादा थंडगार गिळगिळीत स्पर्श टाळावा तसा तो त्या संभाषणाचा स्पर्श टाळत होता. संभाषणाची गाडी चालतां चालतां रघुनाथरावांच्या ऑफिसांतल्या एका माणसावर आली. रघुनाथराव हंसत म्हणाले, " मोठा विक्षिप्त माणूस पाहा, चांगली पंधरा वर्षे नीटपणें आमच्या ऑफिसांत नोकरी केली. फारसा बोलतहि नसे कोणाशीं. कामांतहि चलाख नव्हता. कांहींच विशेष नव्हतें त्याच्यांत आणि अगदीं अचानकपणें एक दिवस तो नाहींसा झाला. "

" नाहींसा झाला ? असें ! " अविनाश उत्सुकतेनें म्हणाला. ही भाषा त्याला परकी वाटत नव्हती.

" हो ना " रघुनाथ उत्साहानें म्हणाले. " घरीं चौकशी केली तर घरच्या माणसांनाहि त्याचा पत्ता नव्हता. पुढें पुष्कळ दिवसांनीं त्याचें घरच्या माणसांना पत्र आलें की आपण कलकत्त्याला मोटारी विकणारा एजंट म्हणून धंदा सुरू केला आहे, आणि धंद्याचा जम बसला की आपण सर्व माणसांना तिकडे घेऊन जाऊं. "

" मग बसला का त्याचा जम ? "

" छे हो, जम कसला बसतोय. त्यानंतर त्यानें घरच्या माणसांना पत्रच पाठवलें नाहीं. पुढें तो एकदां एका माणसाला कलकत्त्याला भेटला. अंगावर फाटके तुटके कपडे होते आणि हातांत एक चामड्याची ऐटबाज बॅग होती. अगदीं कंगाल दिसत होता. त्या गृहस्थानीं त्याला विचारलें, ' कां हो, कसा काय चाललाय बिझिनेस ? त्यावर तो उत्साहानें म्हणाला, ' आतां मात्र नक्की जम बसणार. आतांच त्या एका मोठ्या

जमिनदाराकडे जायचें आहे सौदा पटवायला.' आणि मग तो लगबगीनें निघून गेला. "

" मग ? पुढें काय झालें त्याचें ? "

" पुढें काय होणार बिचाऱ्याचें, संसाराची वाताहात झाली आणि शिवाय स्वतःहि हालअपेष्टांत मेला असेल अशीं विचित्र माणसें पाहा एकेक. "

अविनाशच्या नाकपुड्या स्फुरण पावल्या. तो एकदम घाईनें आणि आवेशानें म्हणाला, " का ? त्यांत काय विचित्र आहे ? कडेवर मुलाला घेऊन फिरणें अगर मुलाच्या नोकरीकरितां खटपट करणें हें देखील फार विचित्र आहे. दिवसांतला बहुतेक वेळ पैशाकरितां धडपड करण्यांत घालविणें हें तर अत्यंत विचित्र आहे. माणसाच्या सगळ्या मनोवृत्तींच्या विरुद्ध आहे. त्यापेक्षां एखादी चकचकीत चामड्याची बॅग हातांत घेऊन फिरण्याची हौस असणें हें कमी विचित्र आहे; नव्हे हें अगदी नैसर्गिक आहे. "

त्याच्या त्या आवेशाचें साऱ्यांनाच आश्चर्य वाटलें. सर्वसाधारपणें संभाषणांत आवेश आणायचा नसतो. सारें कांहीं हसत खेळत चालायचें असा संकेत आहे. म्हणून रघुनाथराव खालच्या स्वरांत म्हणाले, " सगळें ठीक आहे हो. पण संसार चालायला हवा ना ? समाज जगायला हवा ना ? "

" कां ? संसार कशाला जगायला हवा ? कां हे सगळे संकेत आहेत. एकदां ते स्वीकारतो आणि त्यांनाच आपण चिटकून राहतों. आंधळेपणानें एवढ्या सगळ्या जबाबदाऱ्या माणसानें कां अंगावर घ्याव्या ? आणि आपल्या सगळ्या नैसर्गिक प्रवृत्तींच्या विरुद्ध कां वागावें ? " अविनाशचें सगळ्या माणसांच्या चेहेऱ्याकडे लक्ष गेलें. त्याचा आवेश एकदम ओसरला, तो शरमला. आणि मग मोठ्या उत्साहानें मामुली विषयांवर तो मामुली प्रकारें बोलूं लागला. पण मग सर्वांनींच त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें.

कृष्णाबाईंना मात्र त्याच्याविषयीं सहानुभूति वाटली. त्याचे स्वप्नांच्या द्रवाचे डोळे, त्याच्या स्फुरणाऱ्या नाकपुड्या आणि त्याच्या कृश मनगटावरची लव–कृष्णाबाईंना वाटलें कीं त्याच्यापुढें उभें राहावें आणि खवळलेल्या वाघिणीप्रमाणें त्याचें संरक्षण करावें. त्याच्यावर हल्ला करणाऱ्या क्रूर लांडग्यांना आपल्या पंजांनीं ओरबडून रक्तबंबाळ करावें. तो जें सगळें वेडसरपणाचें बोलतो आहे त्याच्यावर आंधळेपणानें श्रद्धा ठेवावी. तो जिथें जात आहे तिथें त्याच्या मागोमाग जावें. त्याच्या मार्गांतलें काटेकुटे दूर करावे. त्याला जे हसतात त्यांच्याकडे पाहून त्यांच्याहूनहि मोठ्यानें हसावें.

हे सगळे विचार अतिशय उत्कट होते. विलक्षण नैसर्गिक होते. स्त्रीचें सारें स्त्रीत्व ओतूनच ते विचार निर्माण झाले होते. आणि म्हणूनच ते कृष्णाबाईंना विलक्षण विचित्र वाटलें. ही एखादी वेडाची लहर आहे कीं काय असें त्यांना वाटूं लागलें. पण त्यांच्या अशा वाटण्याला कांहीं महत्त्वच नव्हतें. त्यांच्या मनांतल्या कुठच्या तरी प्रवृत्तींना पूर आला होता; त्या बेफाम झाल्या होत्या; आणि आपल्या बरोबर कृष्णाबाईंना घेऊन त्या कुठेंतरी अपरिहार्यपणें चालल्या होत्या. कृष्णाबाईंना वाटलें कीं दुसरी कोणी तरी कृष्णाबाई आपल्या हृदयांत झोंपली होती, आतां ती एकदम जागी झाली आहे आणि आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ताबा घेत आहे.

कृष्णाबाईंच्या व्यक्तिमत्त्वाचा घडीचा पंखा आता उलट्या बाजूनें उघडला जात होता. त्यावरच्या आकृति साऱ्या विसकल्या जात होत्या. कांहीं नवीनच वेडेवांकडे आकार त्यांच्या मनोवृत्तींतून उमटूं लागले होते.

जेवण झाल्यावर सगळीं माणसें बाहेर गेलीं. अविनाशहि बाहेर जाऊन गोंधळल्यासारखा उभा राहिला. त्याला हात पुसायला टुवाल हवा होता. त्याला तो मिळाला नाहीं. आणि मग कोणी बघत नाही असें पाहून त्यानें आपल्या शर्टच्या टोकालाच घाईनें हात पुसले.

तें पाहून कृष्णाबाईंचा जीव उडून गेला. त्यांना वाटलें कीं आपण टुवाल व्हावें आणि आपल्या अंगाला त्यानें हात पुसावे, आणि चोळामोळा करून आपल्याला कोपऱ्यांत फेकून द्यावें. त्याच्या ओल्या हातांचा स्पर्श आपल्या उरोभागाला झाला आहे असें त्यांना वाटलें आणि त्यांचें सारें शरीर शहारून निघालें. त्यानंतर त्यांना स्वतःला आवरणें शक्यच नव्हतें. आपल्याजवळ जें देण्यासारखें आहे तें सगळें त्याला दिल्याशिवाय स्वस्थ राहणें त्यांना शक्यच नव्हतें. ज्या संसाराच्या साऱ्या बंधनांनीं त्यांना जखडून ठेवलें होतें त्यांचा त्यांना विलक्षण संताप आला. जें त्यांनीं सारा जन्म वेंचून उभारलें होतें तें छिन्नविछिन्न करायला त्या उत्सुक झाल्या होत्या.

रात्रीं त्या आपल्या खोलींत उशीरांच झोंपायला गेल्या. आणि रघुनाथरावांना झोंप लागली आहे असें जेव्हां त्यांना आढळून आलें तेव्हां त्यांना मोकळें मोकळें वाटूं लागलें. एखाद्या तरुण मुलीसारखी त्यांनीं स्वतःभोंवतीं गिरकी मारली आणि मग हाताच्या पंजावर हनुवटी टेकून त्या आरशांत स्वतःकडे पाहत उभ्या राहिल्या. त्यांनीं तिरप्या नजरेनें पाहिलें, मिस्किलपणें पाहिलें, रुसव्यानें पाहिलें, क्षमायाचनेच्या थाटांत पाहिलें आणि मग त्या खरोखरच लाजल्या; अनेक वर्षांत लाजल्या नव्हत्या तशा लाजल्या. आपल्या छातीवरचा पदर त्यांनीं ओढून घेतला. पदराची किनार थोडी सरकवली आणि उरोभाग अधिकच अनावृत केला. त्या पाठमोऱ्या उभ्या राहिल्या आणि मुरडून त्यांनीं स्वतःकडे पाहिलें. आपला अंबाडा त्यांनीं चांचपला, जणू पुरुषाला काबीज करणारीं आपलीं सगळीं शस्त्रें त्यांनीं तपासून पाहिलीं.

आणि मग एकदम त्यांना खुदुखुदु हसूं आलें. कितीतरी वेळ त्या तशा हंसत होत्या. त्यांच्या साऱ्या अंगाला गुदगुल्या होत होत्या. हसतां हसतां त्यांचें लक्ष भिंतीवरच्या चित्राकडे गेलें. लग्न झाल्यावर त्यांनींच तें तेथें लावलें होतें. आणि आपण तें कां लावलें होतें त्याचा त्यांना विशेषसा उलगडा झालाच नव्हता. त्या चित्रांत एका तळ्याच्या किनाऱ्याला एक

तरुण आणि एक तरुणी बसलीं होतीं. चंद्रप्रकाशांत त्या तळ्याचें पाणी चमकत होतें. नुसतें लवथवत होतें. ती तरुण स्त्री त्या पाण्याकडे असुसल्या नजरेनें पहात होती. आणि एक तरुण टक लावून तिच्याकडे पाहत होता. त्या चित्राकडे त्या उगीचच पाहात राहिल्या. आणि पाहतां पाहतां तो तरुण एकदम उठला. तें चमकणारें लवथवणारें पाणी त्यानें ओंजळीत घेतलें आणि त्या तरुणीच्या उघड्या मांडीवर टाकलें आणि मग कृष्णाबाईच्याहि अंगावर उडवलें.

तें पाणी अंगावर पडतांच कृष्णाबाई दचकल्या. आणि मग एकदम त्यांच्या ध्यानांत आलें कीं तो तरुण म्हणजे अविनाश आहे. एकदम कसला तरी उलगडा झाल्यासारखें त्यांना वाटलें. त्या एकदम विचारमग्न झाल्या आणि खिडकीत उभ्या राहिल्या. त्यांच्या खिडकींच्या उजेडाचा चौकोन खाली रस्त्यावर पडला होता. त्या चौकोनांत कृष्णाबाईची आकृती उमटली होती. त्या चौकोनाच्याच शेजारीं दुसरा एक चौकोन उमटला होता. आणि त्यांत अविनाशची आकृती मध्येंच दिसायची आणि दिसेनाशी व्हायची. बहुधा तो येरझारा घालीत असावा. त्याची ती दिसणारी व दिसेनाशी होणारी छाया पाहून कृष्णाबाईच्या पोटांत कालवल्यासारखें झालें. त्या तशाच खिडकींत उभ्या राहून त्या छायेची हालचाल न्याहाळत राहिल्या. आणि मग एकदम ती छायेची हालचाल थांबली. तो तरुण खिडकींतच उभा राहिला. बहुधा त्याचें लक्ष कृष्णाबाईच्या छायेकडे गेलें असावें. त्या नुसत्या कल्पनेनें त्या लाजल्या. त्यांना वाटलें कीं त्या तरुणानें जणू आपल्या वस्त्रावस्त्राला हात घातला आहे. किती तरी वेळ तीं दोघें तशींच खिडक्यांत राहिलीं आणि मग कृष्णाबाईनीं एकदम हात वर करून अविनाशला खूण केली. थोडा वेळ अविनाशची सांवली स्तब्ध राहिली; आणि त्या सावलीनेंहि जरासा हात हालवला, कृष्णाबाईनीं पुन्हां हात हालवला. आणि मग त्या सांवलीचा हात जोरजोरांत हालूं लागला. अनिमिष नेत्रांनीं कृष्णाबाई त्या हलत्या हाताकडे पाहात राहिल्या. मग एकदम त्यांनीं दिवा मालवला आणि अंथरुणावर पडून आपलें

दुसऱ्या दिवशीं कृष्णाबाई उठल्या तेव्हां त्या एकाच कल्पनेनें झपाटलेल्या होत्या. अविनाशला त्यांना आत्मदान करायचें होतें. हें सगळें ठरूनच गेलें होतें. त्या बाबतींत कांहींच अडचणी शिल्लक राहिल्या नव्हत्या. आतां फक्त तो क्षण यायचा होता. तें मीलन व्हायचें होतें

त्या एकदम पुन्हां तरुण झाल्या होत्या. त्यांच्या चेहेऱ्यावरचे भाव, अधिरेपणा, भित्रेपणा, आणि नवखेपणा दर्शवीत होते. त्यांच्या मनांतले उसळते बदलते भाव त्यांच्या चेहेऱ्यावर उमटत होते. त्यांच्या हालचाली चपल आणि धांदरटपणाच्या झाल्या होत्या. पातळ चापून चोपून नेसल्यामुळें व चेहेऱ्यावरील आणि हालचालींतील फरकांमुळें त्या थोड्या कृश दिसत होत्या; आणि त्यांची वेशभूषा आणि केशरचना एखाद्या अल्लड तरुणीला साजेलशी झाली होती. त्यांच्यांतला हा फरक थोडासा जाणूनबुजून आणि थोडासा अभावितपणें झाला होता. पण तो फरक कोणालाहि जाणवण्यासारखा होता. रघुनाथरावांनाहि तो जाणवला आणि कृष्णाबाईंना जवळ ओढून त्यांचें चुंबन घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. कृष्णाबाई अगदीं बावरून घाबरून गेल्या आणि तेथून निसटल्या. त्यांनीं सुटकेचा श्वास सोडला.

त्यांच्यांतला हा फरक अविनाशला तर ताबडतोब जाणवला. प्रीतीची ही लाजरी खूण त्यानें ओळखली आणि त्याच्या मनोवृत्ती उचंबळून आल्या. विजयाची नशा त्याला चढली. आपल्याला चारी बाजूंनीं जखडणाऱ्या शृंखला आपण तोडल्या; असें त्याला वाटलें. संसारांत आणि पैसे कमावण्यांत गढलेलें हें जग आपण छिन्नविछिन्न केलें असें त्याला वाटूं लागलें. सारें जग आणि तो ह्यांच्यामध्यें जो प्रचंड झगडा चालला होता असें त्याला वाटत होतें, त्यांत त्यानें जगावर अचूक आणि निर्दय प्रहार केला होता आणि रक्त काढलें होतें. तें रक्त भळभळा वाहात होतें. तें पाहून कृष्णाबाईंना चक्कर आली. पण अविनाश त्यांना सावरून विकट हास्य करीत म्हणाला, " हा तर पहिलाच प्रहार आहे. " तो लाचारीनें त्यांच्या पायाशीं आलेल्या ह्या स्त्रीला तिचा संसार उध्वस्त

करून घेऊन जाणार होता. आणि साऱ्या माणसांच्या आत्मसंतोषाला व सामाजिक संकेतांना तडा जाणार होता.

जोरजोरानें तो त्या दिवाणखान्यांत येरझारा घालीत होता. आणि कालाच्या दाराशीं नेमक्या येरझाऱ्या घालणाऱ्या त्या भारदस्त लंबकाला उद्देशून तो स्वतःशींच किंचाळला, " तूं षंढ आहेस, तूं षंढ आहेस. "

जेवणें झालीं. रघुनाथराव व मुलें बाहेर निघून गेलीं; आणि अधिरेपणानें जवळ जवळ धांवतच कृष्णाबाई अविनाशकडे आल्या. तीं दोघें थबकून एकमेकांकडे पाहात राहिलीं. आणि मग दोघांना जें हवें होतें त्याचीच त्यांना भीति वाटली.

कांहीं तरी बोलायचें म्हणून कृष्णाबाई म्हणाल्या, " जेवण आवडलें ना आमचें ? "

अविनाश चांचरत म्हणाला, " हो आवडलें कीं. " आणि मग एकदम अनपेक्षितपणें त्याला धिटाई सुचली– " जेवणच का आणखीहि कांहीं आवडलें कीं ! " त्यानें कृष्णाबाईंच्या उरोभागाकडे आपली नजर लावली. त्यांनीं पदराची किनार सारखी केली.

कृष्णाबाई त्याच्याजवळ सरकल्या. अविनाश त्यांच्या शेजारीं उभा राहिला. ज्या खुर्चीच्या पाठीवर त्यांनीं आपला हात ठेवला होता तेथेंच त्यानें हात ठेवला. हळूं हळूं त्यांचा हात त्याच्या हाताजवळ सरकला, आणि हाताचा हाताला स्पर्श झाला. क्षणभर दोघेंहि तशींच थरथरत उभीं राहिलीं.

मग एकदम वळून कृष्णाबाईंनीं त्याच्या शर्टवरची सुरकुती सारखी केली आणि त्या म्हणाल्या, " कचरा पडला होता. "

त्यानें त्यांचे विसकटलेले केस सारखे केले. अशारीतीनें एकमेकांच्या शरीराला पहिल्यांदा स्पर्श करण्याकरितां स्त्रीपुरुष जीं मूर्ख अनावश्यक कारणें शोधून काढतात तीं त्यांनीं शोधून काढलीं. आणि मग एकदम

कृष्णाबाईंचे दंड पकडून अविनाश आवेशानें म्हणाला, " तूं माझी आहेस. तूं मला हवी आहेस. "

कृष्णाबाई थरथरत म्हणाल्या, " मला भीति वाटते. मला भीति वाटते. " पंधरा वर्षे संसार केलेल्या त्या बाईला ह्या पुरुषाच्या स्पर्शाची भीति वाटत होती. खरोखरच भीति वाटत होती.

दुसऱ्या क्षणाला अविनाशनें त्यांना आपल्या मिठींत कवटाळलें. आधाशीपणानें त्यांच्या साऱ्या अवयवांवरून हात फिरविला. आणि मग त्यांना आपल्या मिठींत घट्ट धरून तो उभा राहिला.

जणू तो सगळ्या जगाला कसलें तरी आव्हान देत होता. डोळे मिटून कृष्णाबाई हें सारें स्वर्गसुख अनुभवीत होत्या. हें सुख त्यांना मिळायचें होतें. हेंच त्यांच्या जीवनाचें सार्थक होतें. आणि हा आनंद उत्कटतेच्या पराकोटीला पोहोंचावा म्हणूनच परमेश्वरानें त्यांना इतकी वाट पाहायला लावली होती. देवानेंच जें योजलें होतें त्याला विरोध करायचा त्यांना काय अधिकार होता ? आणि इतकें सामर्थ्य तरी असतें कोणाजवळ ?

अविनाशनें मग एकदम नाटकीपणानें त्यांना दूर ढकलून दिलें, आणि नेपोलियनचें काम करतांना चार्लस् बॉयर जशा येरझारा घालतो; तशा धीरोदात्त अधिऱ्या येरझारा घालीत तो वीरश्रीनें बोलूं लागला. त्याच्या मनांत जो बंडखोर विचारांचा डोंब उसळला होता तो सारा तो व्यक्त करीत होता. सगळ्या जगाला तो धक्के देणार होता; आग लावणार होता; आणि कृष्णाबाईंची इच्छा असो अगर नसो त्यांना तो घेऊन जाणार होता.

भुतानें झपाटल्याप्रमाणें कृष्णाबाई हें सारें स्तिमितपणें ऐकून घेत होत्या. तो काय बोलत होता त्याकडे त्यांचें लक्षच नव्हतें. तो मूर्खपणानें बोलत होता हें समजणें त्यांना मूर्खपणाचें वाटत होतें. तो बोलत होता; उत्कटतेनें हृदय पिळवटून बोलत होता—तेंच पुष्कळ होतें. त्यांना तो घेऊन जाणार होता, ही तरी सुखाची परमावधी होती. स्वप्नांच्या द्रव्याच्या

बनलेल्या त्याच्या चमकणाऱ्या डोळ्यांकडे त्यांनीं पाहिलें. कृश मनगटावरच्या लवींकडे पाहिलें. त्याच्या पोरकट चेहेऱ्याकडे पाहिलें. बराच वेळ त्या पाहात राहिल्या.

नंतर त्यांनीं दोनतीन दिवस अशाच बेफाम बेहोष अवस्थेंत घालविले. तेवढ्या वेळांत अविनाश अधिकाधिक धीट होत होता; अधिकाधिक विचित्र आणि भडक बेत बोलून दाखवीत होता. आणि कृष्णाबाई शांतपणें आपली सारी बुद्धि एकवटून परिस्थितीचा विचार करीत होत्या. त्यांनी ठरवलं कीं आतां हें घर सोडून जाणें अपरिहार्य आहे. ह्या संसारावर लाथ मारलीच पाहिजे. जातांना बरोबर त्या आपले दागिने घेणार होत्या. त्यांतले बरेच त्यांच्या माहेरचे होते. आणि इतके दिवस खपून त्यांनीं संसार केला त्याचा मोबदला त्या सासरचेहि दागिने घेणार होत्या; सध्या तरी घेणार होत्या मग कदाचित् त्यांनीं ते परत केले असते. अविनाशबरोबर त्या दूरच्या एका शहरीं जाणार होत्या. लहानपणीं एकदां त्या शहरांत गेल्या होत्या आणि त्याची त्यांना भुरळ पडली होती. तेथें जाऊन त्या अविनाशबरोबर रहाणार होत्या. पाहिजे तर त्यानें आपलें शिक्षण चालू ठेवलें असतें; नाहींतर नोकरी धरली असती. कुठच्याहि परिस्थितींत दोघे सुखानें राहिलीं असतीं. अविनाशच्या आणि आपल्या वयांतला फरक त्यांच्या ध्यानांत नव्हता असें नाहीं. पण तरुण स्त्री जें पुरुषाला देते तेंच त्या अविनाशला देणार होत्या. दुसऱ्या कुठच्या तरुण स्त्रीला त्या त्याच्याजवळ येऊं देणार नव्हत्या. त्याकरितां जरूर पडल्यास अविनाशविषयीं त्या कांहीं गैरसमजहि पसरविणार होत्या आणि पांचसात वर्षांनीं, आपली उमेद संपल्यावर अंगावर रॉकेल ओतून जीव देणार होत्या. आणि कदाचित् मरतांना अविनाशलाही आपल्याबरोबर घेऊन जाणार होत्या. हो ! त्यांच्याशिवाय त्या वेडयाची काळजी ह्या जगांत कोण घेणार होते ? एकदां त्यांना वाटलें कीं धाकट्या प्रकाशला आपल्या बरोबर घ्यावें. पण लगेच त्यांनीं कठोरपणानें ती कल्पना सोडून दिली. प्रकाशला बरोबर घेतलें असतें कीं

त्यांच्या वयाची आठवण सारखी अविनाशला झाली असती. रघुनाथराव जबाबदार वृत्तीचे होते. मुलांची ते काळजी घेतल्याशिवाय राहणार नाहींत. अविनाशच्या सोबतीनें आठ दिवस एका मैत्रिणीकडे जायचें आहे असें त्या रघुनाथरावांना सांगणार होत्या.

त्यांनी पुन्हां पुन्हां ह्या सर्व गोष्टींवर विचार केला आणि आपला बेत पक्का झाल्यावर त्यांनीं शांतपणें, व्यवहारीपणें तो अविनाशला सांगितला. अविनाशनें तें सारें ऐकलें आणि तो गांगरून गेला. तो जें अविचारीपणानें आणि धुंदपणें बोलत असे तेंच कृष्णाबाईनीं त्याला शांतपणें आणि व्यवहारीपणें सांगितलें होतें. आणि आपल्या बोलण्याचा हा अर्थ आहे; हें लक्षांत येतांच तो गांगरून गेला. एका विवाहित बाईला पळवून न्यायचें, दूर गांवी जायचें, नोकरी करायची ह्या साऱ्या गोष्टी त्याला अशक्य वाटूं लागल्या. आपल्या आवाक्याबाहेरच्या वाटूं लागल्या. त्याला भीती वाटूं लागली. त्याला कृष्णाबाईचा राग आला. साऱ्या जगाचा राग आला. आणि स्वतःची मात्र दया आली.

कृष्णाबाईचें म्हणणें मुकाट्यानें मान्य करण्याखेरीज त्याला दुसरा मार्गच नव्हता. त्यानें तें केलें. आणि मग कृष्णाबाईच्या पासून तो दूर दूर राहिला. कृष्णाबाईना हें सहन होणें शक्यच नव्हतें. त्यांनीं त्याला मिठी मारली, त्याच्या विनवण्या केल्या. त्या त्याच्यापुढें लाचार झाल्या. मग कृष्णाबाईनी जें दिलें तें त्यानें आधाशीपणानें घेतलें, आणि नंतर जो सूक्ष्म जीव घेणारा छळ प्रेमिकच करूं शकतात तो त्यानें केला. तें सारें दुःख कृष्णाबाईनी आनंदानें सहन केलें.

त्या निघून गेल्या तसा अविनाश अस्वस्थतेनें येरझारा घालूं लागला. छे ! छे ! त्याला गुदमरून मरायचें नव्हतें. ह्याच्यांतून त्याला निसटायचें होतें. ज्या भीतीनें त्याच्या मनांत बंडखोर भावनांचा डोंब उठवला होता त्याच भीतीनें तो विझवून टाकला. अविनाश अस्वस्थतेनें येरझारा घालीत राहिला.

त्याला एकदम वाटलें कीं कालाच्या दाराशीं नेमक्या येरझारा घालणारा तो घड्याळाचा लंबक आपल्याला शांतपणें सांगत आहे—'तू षंढ आहेस. तूं षंढ आहेस.' आणि त्याला पटलें कीं निर्बुद्धपणें मान हलवणाऱ्या ह्या कचकड्याच्या उंटाची भूमिका परमेश्वरानें आपल्याला दिली आहे.

ह्या जाणिवेसरशीं त्याचा सारा स्वाभिमान चवताळून उठला. कृष्णाबाईचा आणि साऱ्या जगाचा त्याला संताप आला. स्वतःची त्याला भयंकर दया वाटूं लागली. आणि मग आपल्या विचारांना त्यानें निराळेंच वळण दिलें.

कृष्णाबाईबरोबर पळून जाऊन कांहींच जमणार नव्हतें, त्यामुळें समाजाला कसलाच तडा पडणार नव्हता, उलट तोच संसाराच्या चक्रांत सांपडणार होता. ती बाई त्याच्या गळ्यांत पडून त्याच्या बंडखोर महत्त्वाकांक्षांना गळफांस लावणार होती. नाहीं, नाहीं,—तो असा फशी पडणार नव्हता. अशा अनेक कृष्णाबाई त्याच्या मनांतल्या पेटत्या विचारावर मोहित होऊन त्याच्याकडे झेपा घेणार होत्या. त्या साऱ्यांचें यौवन उपभोगून तो पुढें जाणार होता; आणि त्यांचे संसार उध्वस्त होऊन पडणार होते. साऱ्या समाजावर तो असा सूड उगवणार होता.

हें सारें त्याला पटलें. त्यानें स्वतःला पुन्हा पुन्हा पटवून दिलें. आपल्या कठोर तर्कबुद्धीचें आणि जळत्या महत्त्वकांक्षेचें त्याला कौतुक वाटलें. आपला विजय झाला अशी त्यानें आरोळी ठोकली. आणि मग संधि साधून रघुनाथरावांना एक चिठी ठेवून तो तेथून निघून गेला.

तो गेला ह्याच्यावर कृष्णाबाईचा पुष्कळ वेळ विश्वासच बसेना. कारण तसा विश्वास बसणें म्हणजे त्यांच्या स्वप्नाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या करण्यासारखें होतें. अखेर नाइलाजानें त्यांनीं त्या घटनेवर विश्वास ठेवला आणि मग सारेंच आटोपलें. कृष्णाबाईच्या जीवनांत कांहींच शिल्लक राहिलें नाहीं. सारा काळोख ! अंधार ! परिस्थितीच्या दगडांनीं बांधलेल्या तळघरांत त्या कोंडून पडल्या. त्या भिंतीवर डोकें आपटून प्राण देण्यापलीकडे आतां कांहींच शिल्लक नव्हतें. असें हें भयानक, स्फोटक कांहीं झालें

आहे ह्याची जगांतल्या कोणालाच जाणीव नव्हती. कृष्णाबाईंचें कोणी नव्हतें: त्या एकट्या होत्या.

कृष्णाबाईंची दारुण निराशा झाली. पण त्यांनीं अविनाशला दोष दिला नाहीं. त्याचें करणें बरोबरच आहे असें त्यांना वाटलें. संसारी बाईला घेऊन जाण्याचा वेडेपणा त्यानें केला नाहीं हें योग्यच होतें. त्याला त्याचें जीवन जगायचें होतें. पण हा विचार त्यांच्या मनांत इतका प्रबळ नव्हता. त्यांना स्वतःचीच भयंकर चीड येत होती त्यांना आपल्या वयाची, आपल्याला गुरफटणाऱ्या संसाराची चीड येत होती. आणि अविनाश असा कमकुवतपणा करील हें आपल्याला आधीं समजलें नाहीं आणि आपण त्याचा बंदोबस्त केला नाहीं ह्याची त्यांना चीड येत होती. स्वतःचा मूर्खपणा असह्य झाला होता.

आपल्या खिडकींतून त्या बाहेर पाहात होत्या. खिडकीच्या उजेडाचा चौकोन रस्त्यावर उमटला होता. आणि त्यांत कृष्णाबाईंची आकृतीहि उमटली होती. पलीकडे अविनाशच्या खिडकीचा चौकोन उमटला होता पण त्यांत मात्र अविनाशची आकृति नव्हती.

सुन्नपणें त्या रिकाम्या चौकोनाकडे कृष्णाबाई पाहात होत्या. इतक्यांत मागून रघुनाथराव आले. त्यांची छाया रस्त्यावरच्या चौकोनांत पडली. आपल्या छायेला बिलगलेली ती छाया पाहणें कृष्णाबाईंना अशक्य झालें. त्या गर्रकन् मागें फिरल्या, आणि परकेपणानें अंग चोरून रघुनाथरावांकडे पाहूं लागल्या.

रघुनाथराव प्रेळपणानें म्हणाले, “ आज चार दिवस झालंय तरी काय तुला ? असें काय करते आहेस तूं ? ” आणि कृष्णाबाईंना जवळ घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

भेदरून जाऊन कृष्णाबाईंनीं एकदम किंकाळी फोडली. आंधळेपणानें रघुनाथरावांच्या अंगावर प्रहार केला आणि सारी शक्ती एकवटून त्यांना दूर ढकललें.



• • •

## लक्तरें : : ९

सुधाबाईच्या अध्यक्षतेखालीं अमेरिकेची सफर करून आलेले एक विद्वान् गृहस्थ अमेरिका आणि महात्मा गांधी ह्या विषयावर व्याख्यान देत होते. 'मीं अमेरिकेंत असतांना, सिनेटर अमुक अमुक मला म्हणाले,' वगैरे उल्लेख करून ते आपलें महात्म्य सिद्ध करीत होतें आणि श्रोतृवृंदाला त्यांच्या अमेरिकेला 'जाऊन आलेल्या पत्नीच्या वेषभूषेची चिकित्सा करायला कुजबुज अपुरी पडत होती. सुधाबाई व्याख्यान ऐकतांना गोड गोड हंसत होत्या आणि व्याख्यात्यांच्या पत्नीच्या कानांत कांहीं गोड गोड कुजबुजत होत्या मध्येंच त्या टाळ्या वाजवीत आणि मग श्रोतेही टाळ्या वाजवीत. वक्ते त्यांच्याकडे पाहून गोड हंसत. आपल्या भाषणाच्या अखेर सुधाबाईचा गौरवपूर्वक उल्लेख करायला ते विसरले नाहींत. सगळें कसें गोड गोड चाललें होतें. अगदीं सुधाबाईना हवें तसें.

सुधाबाई देखण्या होत्या. त्यांचे यजमान श्रीमंत होते. त्यांच्या कांहीं इमारती देखील होत्या. त्यांची घरची मोटर होती. आणि त्यांना फक्त दोनच मुलें होतीं. त्यांचा संसार गोड व प्रेमानें भरलेला होता. असें असलें तरी त्या मात्र आपल्या संसारांत गढून गेलेल्या नव्हत्या. उलट त्यांना वाटायचें कीं सगळ्या जगभर आपण चांगुलपणा आणि गोडपणा पसरावा. जगांत लोक अप्रामाणिकपणें आणि वाईटपणें कां वागतात तेंच त्यांना समजत नसे. म्हणून त्यांनीं ठरवलें होतें कीं सगळ्यांना आपण गोडपणा आणि चांगुलपणा शिकवावा. सगळ्यांनीं आपलीं भांडणें आपल्याकडे आणावीं आणि आपण तीं गोडपणें सोडवावीं असें त्यांना वाटायचें.

सगळ्यांचा दुष्टपणा आणि रांकटपणा आपण सहन करावा अशी गोड टोचणी त्यांच्या मनाला लागलेली असे. त्यामुळें त्या सामाजिक कार्यांत नेहमीं पुढाकार घेत. त्या एका महिला–संघाच्या अध्यक्ष होत्या. तेथें त्या खूप कार्य करीत. आपल्या मोटारींतून श्रीमंत माणसांच्याकडे जाऊन पैसे गोळा करीत. मोठमोठ्या माणसांचीं व्याख्यानें ठरवीत. तरुण मुलींत मिसळून बॅडमिंग्टन खेळत. गरीब, खालच्या वर्गांतल्या बायकांना उपदेश करीत. अगदीं गोड गोड वागत. हें व्याख्यान त्या संघातर्फेंच होत होतें.

भाषण संपल्यावर समारोप करतांना सुधाबाईंनीं म्हटलें, " आपल्या विद्वान् व्याख्यात्यांनीं गोड विचार गोड शब्दांत सांगितले. सगळ्यांनीं जर नेहमींच असें केलें तर जगांत कसले प्रश्नच उरणार नाहींत. मग भांडणें पण होणार नाहींत आणि युद्धें पण होणार नाहींत. महात्मा गांधींनीं तरी हेंच नाहीं कां सांगितलें ? गोड आवाजांत प्रार्थना केली कीं, परमेश्वर देखील प्रसन्न होतो. मला आपलें वाटतें कीं रशियन लोक आणि स्टॅलिन कांहीं दुष्ट नाहींत. त्यांना जर गोड शब्दांत सांगितलें कीं युद्ध करणें आणि दंडेली करणें वाईट आहे तर ते खात्रीनें आपलें ऐकतील. मी म्हणते कीं अमेरिकन लोक जर हे महात्मा गांधीपासून शिकले तर सगळ्या जगाचें कल्याण होईल, सगळें कसें गोड गोड, छान छान होईल. "

टाळ्यांचा एकच कडकडाट झाला. सुधाबाई गोड हंसल्या. सभा संपली. मग पाहुण्यांना चहा देण्याचा छोटासा कार्यक्रम झाला. त्या पाहुण्यांच्या शेजारीं बसल्या आणि त्यांनीं स्वतः त्यांच्या कपांत चहा ओतला. त्यांनीं पाहुण्यांना अमेरिकेविषयीं खूप खूप प्रश्न विचारले. सगळें निरागस कुतूहल ! कोणालाही वाटावें कीं त्या कुतूहलाचा गालगुच्चा घ्यावा आणि पाहुण्यांनीं उत्तर दिलें म्हणजे सुधाबाईंना किती हर्ष होत असे ! त्यामुळें पाहुणे फार खूष झाले. ते खूप उत्साहानें बोलत राहिले. पाहुण्यांची पत्नी मात्र कां कोण जाणें, नाराज झाल्यासारखी दिसत होती. मध्येंच तिनें आपल्या नवऱ्याशीं कांहींतरी मतभेद व्यक्त केला. पाहुणे चिडले. आणि बोंचक थट्टेच्या रूपानें त्यांनीं आपल्या बायकोवरचा

राग व्यक्त केला. सगळीं माणसें हसलीं, पाहुण्यांची बायको गोरीमोरी झाली.

तें पाहून सुधाबाई म्हणाल्या, " असें काय हो ? मला नाहीं हं खपायची हेमांगिनीबाईची थट्टा. मग मुळीं मींच त्यांची बाजू घेईन." त्यांनीं चेहेऱ्यावर भांडखोरपणाचा सुंदर आव आणला. तो पाहून पाहुणे हंसले आणि सुधाबाईकडे टक लावून पहात म्हणाले, " तुम्ही बायका बायका एकच व्हायच्या अखेर. "

अशा रीतीनें सुधाबाईंनीं आपल्या गोड वागणुकीनें वेळ मारून नेली. पण हेमांगिनबाई अशा विचित्र कीं त्या अधिकच रागावल्या. आपल्या नवऱ्याबरोबरच्या भांडणांत सुधाबाई आपल्या मदतीला आल्या, आणि त्यांनीं आपल्या नवऱ्याला सहजासहजीं खुषींत आणलें ह्याचाच त्यांना राग आला

पाहुणे जायला निघाले. सुधाबाई म्हणाल्या, " किती छान माहिती सांगितलीत तुम्ही. मला किनई पुन्हां केव्हांतरी तुम्हांला भेटून आणखी माहिती मिळविली पाहिजे. "

पाहुणे उत्सुकतेनें म्हणाले, " मग ? केव्हां येतां ? आतांच ठरवून टाकू. "

हेमांगिनीबाई फणकाऱ्यानें मोटारींत जाऊन बसल्या, आणि धाडकन् त्यांनीं दार लावून घेतलें.

पाहुण्यांची मोटर गेल्यावर सुधाबाई परत खोलींत आल्या. तेव्हां दोन चार बायकांचें कोंडाळें तेथें उभे होतें. त्यांतली एक फटकळ बाई खालच्या आवाजांत म्हणत होती, " सुधाबाईचें नेहेमींचेंच आहे हें. सारख्या आपण पुढें पुढें करीत असतात. दुसऱ्या कोणाला बोलूं देखील देत नाहींत. "

सुधाबाईंना पाहातांच बोलणें थांबलें. सुधाबाईंनीं तें ऐकलें. त्यांच्या मनाला तें फारच लागलें. पण चटकन् कांहींतरी अपमानकारक बोलणें

त्यांच्या मनाला रुचत नसे. सगळें प्रश्न त्या गोड प्रकारें सोडवीत असत. म्हणून त्यांनीं मनांत ठरवलें कीं त्या फटकळ बाईला आपल्या घरीं चहाला बोलवायचें आणि अगदीं आपल्या मोटारींतून तिला घरीं नेऊन पोहोचवायचें. म्हणजे मग ती फार खूष झाली असती. तिच्या मनांतली सगळीं किल्मिषें नष्ट झालीं असतीं. तिच्यासारख्या खालच्या वर्गांतल्या बायकांशीं देखील सुधाबाई किती प्रेमळपणानें वागतात हें तिला कळलें असतें.

सुधाबाई स्वतःच्या चांगुलपणावर खूष झाल्या. त्यांना वाटलें आपण खूप खूप चांगलें वागावें. अगदीं बॅडमिंग्टन खेळणाऱ्या शाळा कॉलेजां-तल्या मुलींत अल्लडपणें मिसळून खेळावें. खरोखरच त्या बॅडमिंग्टन कोर्टावर गेल्या. पण त्यांना आपण होऊन कोणी जागा देईना. आणि स्वतः होऊन तसें त्यांनीं कोणाला म्हटलें नाहीं. अखेर कोणाच्या तरी सूचनेवरून त्यांना जागा देण्यांत आली. हौसेनें त्या खेळूं लागल्या. त्यांच्या जेव्हां चुका होत तेव्हां त्या गोड गोड हंसत. आणि आपल्या जोडीदार मुलीनेंही असेंच हसावें अशी त्यांची अपेक्षा असे. पण तिनें कपाळाला आठ्या घातल्या आणि ती पुटपुटली, " विचका झाला सगळ्या खेळाचा. "

तिचे ते उद्गार ऐकून सुधाबाई स्तंभितच झाल्या. त्यांना फार फार वाईट वाटलें. अलीकडच्या तरुण पिढींत बेजबाबदारपणा आणि स्वार्थीपणा वाढत आहे ह्याचा त्यांना विषाद वाटला. खरें म्हटलें म्हणजे आपला मोठेपणा विसरून त्या खेळायला आल्या ह्यांचें सगळ्यांना कौतुक वाटायला पाहिजे होतें. निव्वळ बायकांतील खेळण्याच्या प्रवृत्तीला उत्तेजन मिळावें म्हणूनच त्यांनीं हा त्रास घेतला होता हें त्यांना जाणवायला पाहिजे होतें. पण अविचारीपणानें सगळ्यांवर टीका करीत सुटायचें अशीच मुळीं तरुण पिढीची प्रवृत्ति झाली होती.

तरुण पिढीची सुधाबाईंना फार काळजी वाटूं लागली. तींत सुधारणा करावी अशी त्यांना तळमळ लागून राहिली. त्यांनीं खूप खूप

विचार केला आणि मग त्यांना एक गोड कल्पना सुचली. त्यांनीं ठरवलें कीं आपल्या नांवानें एक बॅडमिंग्टन ट्रॉफी ठेवावी आणि त्या ट्रॉफीकरतां बॅडमिंग्टनचें सामने घडवून आणावे म्हणजे मग सगळ्या तरुण पिढीला आपली किंमत कळूं लागेल. असें झालें म्हणजे त्यांना गोड शब्दांत चांगुलपणा शिकवतां येईल.

सुधाबाईंना पुढचा प्रसंग दिसूं लागला. त्या मुलीनें पहिल्याच वर्षी ट्रॉफी जिंकली. सुधाबाईंच्या हस्तें बक्षिसें देण्याचा समारंभ झाला. प्रफुल्लपणें हंसून टाळ्यांच्या कडकडाटांत त्यांनीं ट्रॉफी त्या मुलीला दिली आणि हलक्या आवाजांत हंसत हंसत त्या तिला म्हणाल्या, ' मीं जरी खेळाचा विचका करीत असले तरी तुला इतकें चांगले खेळतां येतें ह्याचा मला फार फार आनंद वाटतो. ' तें ऐकून इतकी लाजली ती मुलगी ! त्यानंतर सुधाबाई मंडळांत गेल्या कीं ती आग्रहानें त्याना खेळायला बोलवून न्यायची अगदीं खूप खूप आदरानें वागायची.

आपल्या चांगुलपणानें सुधाबाई अगदीं सद्गतीत झाल्या. त्यांना वाटलें कीं सगळ्या जगाचा दुष्टपणा आपण सहन करावयाचा आहे. अगदीं केस पिंजारलेल्या दाणगट मवाल्यांचा देखील. त्या कल्पनेनें त्यांचें अंग शिर शिरलें.आणि मग त्यांना आठवण झाली कीं त्या ट्रॉफीकरतां बराच खर्च येईल. त्या विचारांत पडल्या. इतके पैसे कसे खर्च करावें हें त्यांना समजेना. मिस्टर गोगट्यांनीं ( त्या आपल्या यजमानांना बाहेर मिस्टर गोगटे म्हणून संबोधित अगदीं नव्या पद्धतीनें ! ) कांहीं इतके पैसे दिले नसते. बरोबरच होतें. ते झाले म्हणून किती पैसे देणार ? उगीच आपला एकाद्याच्या चांगुलपणाचा फायदा घ्यायचा म्हणजे काय ? इतक्यांत सुधाबाईंना युक्ति सुचली. त्यांनीं आपल्या मुलाला—अशोकला सोन्याचें घड्याळ घेऊन द्यायचें कबूल केलें होतें. ते पैसे सुधाबाईंना त्या ट्रॉफीकरतां वापरतां आले असते. अर्थात् अशोकला फार फार वाईट वाटलें असतें. पण त्याला काय इलाज होता ! चांगुलपणानें वागायचें म्हणजे इतका त्रास सहन केलाच पाहिजे.

आपल्या चांगुलपणाचा सुधाबाईंना फार फार राग आला. इतकें

चांगुलपणानें वागणें चांगलें नाहीं असें त्यांनीं स्वतःला बजावलें. पण त्यांचा कांहीं इलाजच चालेना. इतका चांगुलपणा त्यांच्या मनांत भिनला होता. एक गोड खिन्नपणाच्या तंद्रींत त्या मोटारींत बसल्या आणि घरीं परतल्या.

त्या घरीं आल्या तेव्हां अशोक कोचावर पडला होता. तो शीळ वाजवून सिनेमांतलें गाणें म्हणत होता. आणि हातांतल्या कुठल्या तरी फोटोवर टिचक्या मारीत होता. सुधाबाईंना पाहून त्यानें फोटो मागें ठेवला आणि तो शीळ वाजवायचा थांबला. त्याच्या कपाळाला आंठ्या पडल्या. कशाला ही ब्याद आली असे तो बोलला नाहीं इतकेंच काय तें. त्याच्या चेहेऱ्यावरचा तो भाव सुधाबाईंनीं ह्यापूर्वींही पाहिला होता. आतां तो भाव पाहिल्यावर त्याना भीति वाटली. हतबुद्ध झाल्यासारखें त्यांना वाटलें. बाहेर वावरतांना त्यांना असें कधीं वाटत नसे. त्यांच्या चांगुलपणाचें शस्त्र बाहेर कधीं निष्प्रभ होत नसे. पण आतां मात्र त्यांना तें बोथट सुरीसारखें वाटलें. त्यांना वाटलें कीं अशोक आपल्या हातांतून निसटला. ह्या जाणिवेनें त्या कावऱ्या बावऱ्या झाल्या. काय वाटेल तें झालें तरी त्या त्याला आपल्या हातांतून निसटूं देणार नव्हत्या. आपल्या मनाप्रमाणें वागायला लावणार होत्या. नव्हे—नव्हे चांगुलपणानें वागायला लावणार होत्या.

अगदीं लडिवाळपणानें त्या अशोक जवळ जाऊन बसल्या. अशोकनें आपलें अंग चोरून घेतलें. त्याचे केस कुस्करीत त्या म्हणाल्या—

"केव्हां आला माझा राजा ?"

"मगाशींच"

"खेळायला नाहीं वाटतें गेलास आज ?"

"नाहीं गेलों"

"कां ?"

"उगीच"

"किनई अशोक मला तुझा खेळ एकदां बघायचा आहे. तुमची

मॅच पहायला मला नेशील का रे एकदां ? " सुधाबाईंनीं चांगुलपणाची मर्यादा गांठली.

" तुला काय समजतंय त्यांत ? "

ह्या पुढें चांगुलपणा कसा दाखवायचा तें सुधाताईंना समजेना. त्या हंसत म्हणाल्या, " तूं कीं नाहीं अशोक अगदीं चावट आणि खोडकर झाला आहेस अलीकडे."

" हं "

—मग थोडा वेळ नुसताच गेला. सुधाबाई अशोकच्या अंगावरून हात फिरवीत होत्या. अशोक ते हुताम्यासारखें सहन करीत होता. अखेर सुधाबाईंनीं मुद्याला हात घातला, मोठ्या कुशलतेनें त्यांनीं स्वतःकडे लहानपणा घेतला. अशोकला अगदीं अगदीं आपल्या बरोबरीचा समजल्या.

" किनई अशोक मला बाई एक Request करायची आहे. "

" तें मला वाटलेंच होतें. त्या शिवाय कां तूं माझें इतकें कौतुक करते आहेस. "

अलीकडच्या मुलांप्रमाणें अशोक अगदीं लहान वयांत व्यवहारी बनला होता.

सुधाबाईंना धक्का बसला. पण एखाद्या राजकारणी माणसाची मुत्सद्देगिरी त्यांच्या अंगांत होती. जेव्हां आपलें सामर्थ्य संपुष्टांत आलेलें असतें तेव्हां प्रतिपक्षी देखील टेकीला आलेला असतो हें त्यांना माहीत होतें. अशा वेळेलाच नेट धरला कीं विजय मिळतो हें त्यांना माहीत होतें. त्या अशोकला गुदगुल्या करीत म्हणाल्या " सगळें समजायला लागलंय लबाडाला. मग ऐकणार ना माझें ? " अशोक त्यांचे हात दूर ढकलीत म्हणाला, " आधीं काय हवंय् तें सांग. " आतां मात्र सुधाबाई निराश झाल्या. त्या निरुत्साहानें म्हणाल्या, " किनई तुझे घड्याळाचे पैसे माझ्याजवळ आहेत ना त्यांचा एक चांगला उपयोग मला करायचा

आहे. त्या पैशांतून मला एक ट्रॉफी ठेवायची आहे–खेळांतल्या प्राविण्या-करतां. तुला इतकी खेळांची हौस आहे... ''

अशोक तटकन् उठून बसला. तो खेकसला, '' हें पहा आई, असलें नाहीं हं चालायचें. मला कोणावर उपकार करायचे नाहींत. तुला हौस आली असली तर तूं कर.''

'' अरे पण असें रागवायला काय झालें ? ''

'' रागवूं नाहीं तर काय करूं ? सगळ्यांशीं चांगुलपणें वागायला तुला जमतें, पण माझें मात्र काम करायला जमत नाहीं.''

सुधाबाईंना पुन्हां उत्साह वाटायला लागला. त्या म्हणाल्या,''अरे, पण काम आहे तरी काय तुझें ? इतके दिवस कां नाहीं बोललास ? ''

''बोलायला कशाला पाहिजे, आमची युनिव्हर्सिटीची परीक्षा झाली हें तुला माहित नाहीं वाटतं ?''

'' मग ? ''

'' मग काय कपाळ ! पेपर वाईट गेले आहेत ! ''

'' कां ? अभ्यास नाहीं केलास वाटते ? तरी मी सांगत होते. ''

'' हें पहा आई, मला ह्या उपदेशाचा अगदीं कंटाळा आला आहे. उपदेश करणें सोपें आहे; तूं अभ्यास कर म्हणजे समजेल कसें डोकें दुखतें तें. ''

'' अरे, पण अभ्यास केल्याशिवाय कसें होईल ? ''

'' कशाला अभ्यास करायला हवा ? मला काय खर्डेघाशी करायची आहे ? मी बिझिनेस करणार आहे बाबांच्यासारखा. तिथें अभ्यासाचा काय उपयोग ? तिथें चलाखी लागते. नुसती शिमिटांत भेसळ करतां आली तरी हजारों रुपये मिळतात .''

सुधाबाई बावचळून त्याच्याकडे पहात राहिल्या. हें सगळें त्यांना नवीन होतें. कठोर होतें. उग्र होतें. ह्यांत चांगुलपणा कांहींच नव्हता. त्या म्हणाल्या, '' अरे हें पाप आहे, ही लबाडी आहे. ''

" मग आहेच लबाडी. कोण लेकाचा जगांत प्रामाणिक आहे. जग सगळें लबाडीवरच चालतें. म्हणून सांगतों कीं तूं त्या प्रो. दामल्यांच्या बायकोला सांग. ते परीक्षक आहेत. म्हणजे मग होईल काम सगळें. "

" छे ! छे. अशोक ! असें कसें होईल माझ्या हातून. "

" न व्हायला काय झालें ? लोकांना पार्ट्या देऊन जर महिला मंडळाचें अध्यक्ष होता येतें, तर हें व्हायला काय झालें ? कशाला उगीच देखावा करतेस ? मी काय आतां लहान आहे ? मला सगळें समजतें. " ताडकन् उठून अशोक निघून गेला.

आणि सुधाबाई मटकन् खालीं बसल्या. आपल्या अंगांतली सारी शक्ति झिरपून गेली असें त्यांना वाटलें. जीवनाविषयींच्या आणि स्वतःविषयींच्या त्यांच्या साऱ्या कल्पनांचीं लक्तरें झालीं. त्या कोसळल्या. आणि त्या उध्वस्त कल्पनांच्या विश्वांत सुधाबाई असहायपणें सांपडल्या. त्यांना अशोकची भीति वाटूं लागली, नव्हे अशोकच्या रूपानें त्यांना डिवचणाऱ्या कठोर भयाण सत्याची त्यांना भीति वाटूं लागली, स्वतःचीच त्यांना भीति वाटूं लागली, आपल्या भोंवती शून्यपणाची मोठमोठी होत जाणारी अनंत वर्तुळें त्यांना दिसूं लागलीं.

अर्थात् हें थोडा वेळच टिकलें. जन्मभर ज्या कल्पनांना कवटाळलें त्या कांहीं माणूस सहजासहजीं सोडून देत नाहीं. हळुहळुं आपल्या जुन्या कल्पनांचें इमले पुन्हां उभरण्याचा त्या प्रयत्न करूं लागल्या. त्यांना वाटूं लागलें कीं अशोकला काय समजतें, तो लहान आहे. शिवाय पेपर वाईट गेल्यामुळें तो बिथरला आहे.

तेवढ्यांत मिस्टर गोगटे परत आले. ते खुशींत होते. आपल्या बायकोच्या वक्षःस्थलावर त्यांनीं सिगारेटची पेटी फेकली, मग हळुंच तिचा गालगुच्चा घेतला, आणि नंतर त्यांनीं चक्क सुधाबाईंना डोळा मारला.

सुधाबाई गाल फुगवून म्हणाल्या, " इश्श ! "

मिस्टर गोगटे हात जुळवून म्हणाले, " माफी असावी हुजूर. "

आपल्या आवडत्या कुत्र्याचें जसें कौतुक करावें तसें त्यांनीं सुधा-बाईचें कौतुक केलें. बहुतेक पुरुष आपल्या बायकांशीं असेंच वागतात. आणि बहुतेक बायका लाडक्या कुत्र्याची भूमिका आनंदानें स्वतःकडे घेतात. सुधाबाईंना उल्हास वाटला. जें गोड व चांगुलपणानें भरलेलें त्यांचें विश्व मरून पडल्यासारखें वाटत होतें. त्यांच्यांत धुगधुगी आली. मिस्टर गोगटे जो हास्यविनोद करीत होते, आणि जो प्रेमळपणा दाखवीत तो सर्व खरा आहे असें वाटून घेण्याकरितां त्या सारख्या धडपडत होत्या.

थोडा वेळ संभाषण झाल्यावर त्यांनीं विचारलें, " लोक शिमिटांत भेसळ करतात कां हो ? "

मिस्टर गोगट्यांनीं म्हटलें," अग, व्यापारांत हें असें चालायचेंच." थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गोष्टी केल्यावर सुधाबाई गोड हंसून म्हणाल्या, " पण गडे आपण विकतो त्या शिमिटांत भेसळ नसेल नाहीं का ? "

मिस्टर गोगटे हंसायचं थांबले. त्यांनीं संशयी मुद्रेनें एकदां सुधा-बाईकडे पाहिलें. त्यांना वाटत होतें कीं सुधाबाईंनीं आपल्या मोकळेपणाचा गैरफायदा घेतला. आपलीं बोटें कोचाच्या हातावर ते थोडा वेळ आपटीत राहिले. सुधाबाईंनीं त्यांच्या गळ्याभोंवतीं हात टाकला. मिस्टर गोगट्यांनीं तो पकडला आणि मग हंसत म्हणाले, " असें पहा, सरकारी अधिकारी आहेत मूर्ख. त्यांनीं कंट्रोलचे भाव फार स्वस्त ठेवले आहेत. आजकाल त्या भावानें विकणें परवडत नाहीं. तेव्हां कमी भावानें विकायचें म्हणजे थोडी भेसळ करावी लागणारच. असें असतें तें. "

मिस्टर गोगट्यांशीं एकमत होण्याच्या उत्सुकतेनें सुधाबाई म्हणाल्या, " म्हणजे त्यांत कांहीं, फसवणूक नाहीं, नाहीं का ? हें आपलें सरकारच्या चुकीमुळें करावें लागतें इतकेंच. "

सुधाबाईंनीं एक निश्वास सोडला. अशोक म्हणत होता तें खोटें होतें एकंदरींत. आणि मिस्टर गोगटे किती समजूतदार होते ! सुधाबाईंनीं ठरवलें कीं आपण गोड गोड बोलून त्यांना भेसळ करण्यापासून परावृत्त

करावें. त्याकरितां काय गोड गोड बोलायचें तें त्या ठरवूं लागल्या.

इतक्यांत दारावरची घंटा वाजली आणि मिस्टर गोगटे चटकन् उठून पुढें झाले. सुधाबाईंना हें जाणवलें. मिस्टर गोगटे जे खुषींत होते त्याचें कारण निराळें होतें हें त्यांच्या ध्यानांत आलें. कोणी तरी येणार होतें—कांहीं तरी लाभ होणार होता म्हणून ती सगळी खुशी होती. प्रेमाचा भाग त्यांत थोडाच होता. सुधाबाईंनीं स्वतःच्या मनाला जरब दिली. सगळ्या वाईट विचारांना त्यांनीं मनांतून हांकलून दिलें. त्या खेंकसल्या, ' चार पैसे मिळणार असले तर मनुष्य सहाजिकच खुशींत येतो. त्यांत एवढें चुकलें तें काय ? '

बाहेर त्या आलेल्या माणसाशीं मिस्टर गोगटे बराच वेळ कुजबुजत होते. मग नोटा मोजल्याचा आवाज आला. तेवढ्यांत् दारावरची घंटा परत वाजली. क्षणभर स्तब्धता. मग मिस्टर गोगटे एकदम धडपडले. रामाला त्यांनीं हांक मारून बाहेरच्या दरवाजाशीं उभें केलें आणि चटकन् दिवे मालवले. मग धांवत ते घरांत आले आणि सुधाबाईंचा दंड पकडून घोगऱ्या आवाजांत म्हणाले," हे पैसे घे. आणि मागल्या दारानें बाहेर पडून त्या बोळांतून जा. आणि पैसे भोंसल्यांच्याकडे नेऊन दे. जा जा लवकर."

" पण का ? " सुधाबाई भेदरून म्हणाल्या.

" मूर्ख ! Idiot ! पोलीस आले आहेत. पागडी डिपॉझिट घेतलें आहे मीं एका माणसाकडून. "

" पण–पण भिती वाटते मला. पोलीस पकडतील ना मला. "

सुधाबाईंचा दंड पकडून त्यांना मागच्या दरवाजाकडे नेत ते म्हणाले, " कसे पकडतील ? आणि नाहीं तर मला पकडतील ते. माझ्या पैशावर चैन करतेस तेव्हां. जा मुकाट्यानें नाहीं तर गळा दाबीन. "

मिस्टर गोगट्यांनीं सुधाबाईंना दाराबाहेर ढकलून दिलें. तें दार एका बाजूला गटारांत उघडत असे. आणि तें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें नव्हतें. जीव मुठींत घेऊन सुधाबाई त्या घाणेरड्या बोळकंडी-

तून बाहेर पडल्या आणि मग जवळजवळ धांवतच सुटल्या. नेहेमींच्या सुधाबाईहून ह्या सुधाबाई फार वेगळ्या होत्या. जग चांगले आहे असें त्यांना वाटत नव्हतें. जगाशीं चांगुलपणानें वागावें असें त्यांना वाटत नव्हतें. साऱ्या जगाविषयीं त्यांना संशय वाटत होता. जिथें तिथें पोलीस दिसत होते. पैसे लुबाडणारे चोर दिसत होते. गोड हास्य त्यांच्या चेहऱ्यावर फुललें नव्हतें उलट भीतीनें त्यांचा चेहरा विद्रूप झाला होता. त्यांना वाटत होतें कीं पिस्तुलाचे बार करून आजुबाजूच्या साऱ्या माणसांना ठार करावें; आणि आपला मार्ग निष्कंटक करावा असें त्यांना वाटत होतें.

मिस्टर गोगट्यांचा त्यांना विलक्षण द्वेष वाटत होता. त्यांचें परत तोंड देखील पहायला त्या तयार नव्हत्या. त्या घाणेरड्या बोळांत–नव्हे त्या घरांत त्यांना पुन्हां कधींही जायचें नव्हतें. आपली सारी प्रतिष्ठा धुळीला मिळविणाऱ्या अशा प्रसंगांत त्यांना पुन्हां सांपडायचें नव्हतें. त्यांना त्यांची प्रतिष्ठा हवी होती. मंडळ हवें होतें. अध्यक्षपद हवें होतें. सभा हव्या होत्या. चहाच्या पार्ट्या हव्या होत्या. त्याशिवाय त्यांना जगणें कसें शक्य होतें ?

अखेर कशाबशा त्या भोसल्यांच्या घरीं पोहोंचल्या. दारावरच्या नोकरानें त्यांना नखशिखान्त न्याहाळलें. मग जरा विचार करून तो म्हणाला, " साहेब आतां भेटायचे नाहींत. उद्यां सकाळीं भेटा त्यांना."

" नाहीं नाहीं. मला आतांच भेटले पाहिजे त्यांच्याकडे फार महत्त्वाचें काम आहे. अगदीं ताबडतोब भेटायचें आहे."

नोकरानें त्यांना पुन्हां नखशिखान्त न्याहाळलें. मग त्यानें विचारलें " साहेबांनीं आतां बोलावलें होतें तुम्हांला ?"

कसेंही करून आंत प्रवेश मिळावा ह्या हेतूनें त्या म्हणाल्या "हो."

नोकर एकदम फिदी फिदी हसला. आणि म्हणाला " वा. वा, मग जा कीं आंत. साहेब आपली वाट पहात आहेत. असें आधींच कां नाहीं सांगितलेंत बरें."

सुधाबाई आंत गेल्या. आंत भोसले समोर एक पेला ठेवून

अस्ताव्यस्तपणें बसले होते. त्यांची बायको बऱ्याच वर्षांपूर्वी संशयास्पद स्थितींत वारली होती. आणि त्यानंतर त्यांनीं लग्नच केलें नव्हतें. सुधाबाई त्यांचा तो अवतार पाहून दचकल्या. पण तशाच पुढें होऊन म्हणाल्या, " हे पैसे मिस्टर गोगट्यांनीं ठेवायला दिले आहेत."

शब्दांचा काळजीपूर्वक उच्चार करीत ते म्हणाले, " पैसे दिले आहेत ? ठेवायला दिले आहेत ? पैसे ठेवायला दिले आहेत ? बरें. बरें. ठीक. All-right. मी पैसे नीट ठेवतो."

" बरें आहे मीं जातें " सुधाबाई म्हणाल्या.

" नको. नाहीं. No. जाऊं नको नका. बसा. बसून रहा. " ते उठून उभे राहिले. त्यांना अधिक शुद्ध आली. ते म्हणाले, " तूं छान आहेस. मला आवडतेस. तूं पण इथेंच रहा. पैसे ठेवले तशी बायको पण ठेवली. ही–ही ही.–ही–ही–ही."

दांत ओठ खाऊन सुधाबाई म्हणाल्या, " बेशरम ! काय बोलताय त्याची शुद्ध तरी आहे कां तुम्हांला ? "

झोकांड्या देत पुढें सरकत ते म्हणाले, " आली मोठी पतिव्रता. पुरुषांपुढें सारखी नाचते. गोड गोड बोलते. फंड गोळा करते. लोक काय उगीच पैसे देतात ? ते तुझ्या चेहऱ्याकडे बघून देतात." त्यांनीं सुधाबाईंचा हात पकडण्याचा प्रयत्न केला.

सुधाबाईंनीं हात हिसडून घेतला आणि त्या पळत सुटल्या. त्या भोंसल्यापासून दूर पळत होत्या. गोगट्यांपासून दूर पळत होत्या. त्या स्वतःच्या चांगुलपणापासून दूर पळत होत्या. स्वतःपासून दूर पळत होत्या.

पण कुठे जायचें तें मात्र त्यांना कळत नव्हतें.



# चक्र : : ६

एखाद्या सुट्टीच्या दिवशीं मी आगगाडीचें तिकीट काढतों. आणि एकटाच कोठेंतरी भटकायला जातों. म्हणजे मग स्वतःचा सहवास लाभतो. जगाच्या वर्दळीमुळें बंद झालेलीं हृदयाचीं कवाडें शांततेच्या स्पर्शानें परत उघडतात. जीविताचा ठराविक सांचा मोडतो...

त्या दिवशीं आकाशाला सारखी गळती लागली होती. आकाश व्यापून राहिलेले मेघ इतके खालीं लोंबले होते कीं डोंगरांचे माथे त्यांत बुडून गेले होते. पावसाचा आणि संधिप्रकाशाचा धूर सर्वत्र कोंदून राहिला होता. सारें वातावरण कसें नुसतें कुंद झालें होतें. वारा मधूनच झोकांड्या देत होता. पिवळीं पानें भिरकटत गळून पडत होतीं.

झाडें ओलत्यानें कुडकुडत होतीं. डोंगर पाणी पिऊन मस्तीला आले होते. जमीन ओलाव्याच्या गिलावानें लकाकत होती. तिच्यांत पावलें भसाभस रुतत होतीं. आणि त्यांच्या खुणांतून पाणी उमळत होतें. ठिकाठिकाणीं सांठलेल्या पाण्यांत प्रतिबिंबाची प्रतिसृष्टी निर्माण झाली होती. आणि आडदांडपणें वाहणाऱ्या गढूळ पाण्याच्या ओहोळांत कडेची माती विरघळत होती. गढूळपणाचे थरावर थर चढत होते—दारूचा कैफ चढत जावा तसे !

तिथें पालापाचोळा कुजत होता. आणि मधूनच हिरव्या शेवाळाची बुळबुळ जाणवत होती. एक प्रचंड काळा फत्तर उलथल्यासारखा पडला होता. आणि त्याच्या भेगांतून जोमदार कांटेरी झुडपें उफाळलीं होतीं.

त्यांच्यावरचीं पिवळीं फुलें खदखदां हंसत होतीं. पाणथळीच्या जागेंत एक अर्धमेलें झालेलें किरडूं जागच्या जागीं वळवळत होतें. आणि एका निबिड वटवृक्षाखालच्या चतकोरभर कोरड्या जागेंत लवलवणाऱ्या कृमिकीटकांचें एक स्वतंत्र जगच आपलें क्षणिक जीवित आधाशीपणानें जगत होतें. तिथें कोळ्याच्या जाळ्यांत गुंतलेली माशी होती. एका सरडोक्याचें आणि पालीचें तुंबळ युद्ध चाललें होतें. लालभडक कुंभारीण रागानें गुणगुणत जागच्या जागीं उडत होती. चिमुकले अनेक पायांचे कीटक खड्यावरून कोलमडून पडत होते. आणि एक मोठाल्या काळ्या डोंगळ्यांची रांग सतत कुठूनशी येत होती, आणि वळणें घेत झाडाच्या एका फटींत लुप्त होत होती.

त्या इवल्याशा जागेंत, जगण्याची जी दुर्दम्य पिसाट इच्छा होती, जी वखवखलेली भूक होती, जें नरडीचा घोट घेणारें शत्रुत्व होतें, जी निर्मिति आणि संहार होता, तें सारें पाहून मी जागच्या जागीं थबकलों. माझ्या विचारांना भोवळ आली. मन भीषण अंधारांत चाचपडूं लागलें. हें विश्व एक नाहीं; तर निरनिराळ्या पातळीवर आणि निरनिराळ्या प्रमाणांवर चालणाऱ्या अनेक विश्वांचें हें एक अवाढव्य कुटुंब आहे ह्याची जाणीव मला झाली.

आणि तरी ह्या विश्वांत एकच व्यापार चाललेला असतो—उत्पत्ति आणि लय! जन्ममरणाचें एक जगड्व्याळ चक्र माझ्या नजरेसमोर निष्ठुरपणें गरगरां फिरूं लागलें. युगें धावलीं. अनेक विश्वांची निर्मिति आणि संहार झाला. अवकाश आणि काल ह्यासंबंधींचीं माझीं क्षुद्र परिमाणें छिन्नविछिन्न झालीं. चौऱ्यांयशीं लक्ष योनींतून प्रवास करणाऱ्या आत्म्याच्या वेदना—त्याचा तडफडाड—मला त्या क्षणीं समजल्या, नव्हे मी त्या अनुभवल्या! हिंदूंच्या धर्मकल्पनांत परत—परत आढळणाऱ्या चक्रामागची विशाल कल्पना माझ्या नजरेसमोर उभी राहिली. मुक्तीचा-मोक्षाचा—शोध सतत करणाऱ्या महर्षींच्या आत्म्यांची तळमळ मला जाणवली. सारें समजतें आहे असें वाटूं लागलें. कांहींच समजेनासे झालें!

मीं सभोंवतीं दूरवर एक नजर टाकली. धरित्रीच्या रंध्रारंध्रांतून हिरवें जीवन नुसतें उफाळलें होतें. डोंगरमाथ्यांवर, दऱ्याखोऱ्यांत, सांदी-फटींत हिरव्या झाडीची नुसती दाटी झाली होती. तिथें आपल्या विस्ताराचा डौल संभाळणारे भव्य वृक्षराज होते, आणि खुरटीं कांटेरीं झुडपें होतीं. बांबूंच्या निबिड वसाहती होत्या, आणि बाभळींचीं बनें होतीं. धरित्रीच्या वक्षांत घुसलेल्या बाणांसारखे दिसणारे उंच, काळे ताडवृक्ष होते, आणि पाण्याच्या प्रवाहांत माना वाकवून उभे राहिलेले लव्हाळे होते. जागोजाग माजलेल्या वेलींवरचीं पिवळीं फुलें होतीं, आणि गवतावर डोलणारे लाल-पांढरे तुरे होते. पेरकुटांच्या कांटेरी बाहूंतून घाणेरीचीं झुडपें माना वर काढीत होतीं, आणि त्यांच्यावर सांवट धरून एक वटवृक्ष त्यांना गुदमरून टाकीत होता.

मध्येंच उमळून पडलेल्या वृक्षाचा एक अजस्र सांगाडा होता. पण त्याला चिकटलेल्या मातींतून हिरवळ डोकावत होती, आणि पानाफुलांनीं गजबजलेल्या एका आधाशी वेलीनें त्या सांगाड्याला कवटाळलें होतें.

नजरेच्या टप्प्यापर्यंत माना उंचावून झाडी माझ्याकडे पाहत होती. जीवनाचा हिरवा समुद्र नुसता उसळत होता, आणि त्यावर पाण्याचा सतत अभिषेक होत होता. विश्वकर्म्यानें निर्मितीचा महायज्ञ आरंभला होता, आणि त्या होमकुंडांत स्वर्गीय नैवेद्याचा हा स्वाहाकार चालला होता. कोसळणारे जलप्रवाह मंत्रघोष करीत होते. त्या महायज्ञाची पूर्तता आतां होत आली होती.

पण दक्षराजाच्या महायज्ञाचा विध्वंस करणारा महारुद्र संतप्त होऊन ह्या यज्ञाचाहि विनाश करणारा होता. ग्रीष्माची आग ओतून हें जीवन सारें होरपळून टाकणार होता. त्या अंगारानें करपलेल्या काळ्या धरित्रीवरून उष्ण वायू चटके देत फिरणार होते. कोळपून गेलेलें जीवित तेथें केवळ बीजरूपानें वास करणार:होतें आणि परत निर्मितीच्या नव्या यज्ञाची सिद्धता होणार होती.

त्यांतला सळसळणारा जिवंतपणा मला जाणवत नव्हता, तर त्यांतली निष्फलता, निरर्थकता माझ्या मनाला सुन्न करीत होती. त्या चक्राच्या गतीनुसार निर्माण होणाऱ्या आणि नाश पावणाऱ्या त्या विराट विश्वाची अगतिकता पाहून मी भांबावून गेलों.

त्या प्रत्येक हिरव्या पानांत, फुलांत, वृक्षांत, झुडपांत, वेलींत मला एक नवीन भयानक अस्तित्व जाणवूं लागलें टाहो फोडून तें मला सांगूं लागलें. "तो मी आहे. तो मी आहे." वस्तुमात्राच्या कणाकणांतून मला तो एकच ध्वनि ऐकायला येऊं लागला.

तो ध्वनि ऐकून माझ्या मनांतलें बेगडी शहाणपण सारें वितळून गेलें, जाणिवेच्या कक्षा रुंदावल्या, मनाचीं द्वारें खडाखड उघडलीं, आणि जमिनीपर्यंत लवून प्रणाम करून मीं त्या नव्या विशाल अनुभूतीचें, त्या विराट भयानक अस्तित्वाचें स्वागत केलें. त्या अस्तित्वाच्या जाणिवेनें माझ्या भावनांचा उथळपणा आणि खळखळाट नष्ट झाला. वृत्तींतला हास्यास्पद अधिरेपणा मावळला. शांतगंभीर सोशिकपणाचा प्रादुर्भाव अंतःकरणांत झाला. मृत्यूची आणि शारीरिक व्याधींची जी एक घाणेरडी भीति माझ्या मनांत होती ती उमळून पडली. शांतीचा कधीं न आटणारा प्रवाह हृदयांतून झुळुझुळु वाहूं लागला.

मानवी जीवनांतलें सारें कारुण्य मूर्तिमंत माझ्या नजरेसमोर अवतरलें. अखेर आपल्या जीविताला वैतागून शरयु नदींत प्राण देणाऱ्या रामचंद्राची मला आठवण झाली. आपसांत लढल्यामुळें होणारा अवघ्या यादवकुलाचा नाश अगतिकपणें पाहणाऱ्या योगेश्वर कृष्णाची मनःस्थिती मीं अनुभवली. भारतीय युद्धाच्या मुळाशीं असलेल्या दुर्योधनाच्या दुराग्रहामागच्या साऱ्या जळत्या द्वेषाची भडकती ज्वाला मीं पाहिली. आपल्या पत्नीशीं संग करून मृत्यूच्या जबड्यांत उडी टाकणारा पंडुराजा, जन्मभर आपल्या डोळस नेत्रांवर काळी पट्टी बांधून राहणारी गांधारी, आपल्या सुनांचा हृदयद्रावक शोक ऐकणाऱ्या वृद्ध, दुबळ्या, आंधळ्या धृतराष्ट्राचा एकाकीपणा, क्षत्रियपुत्र कर्णाचा सतत होणारा तेजोभंग

आणि आपल्या पुत्रांच्या प्राणांची भीक त्याच्याजवळ मागणारी त्याची माता कुंती, अश्वत्थाम्यानें उगवलेला भयंकर सूड आणि ' युगानुयुगें पिशाच्च होऊन हिंडशील ' असा त्याला मिळालेला शाप, मत्स्यगंधेपायीं वेडा झालेला शंतनु आणि आपल्या बापाची कामवासना पुरी व्हावी म्हणून आजन्म ब्रह्मचारी राहिलेला आणि राजपदाला मुकलेला भीष्म, हत्तीच्या गळ्यांतल्या घंटेखालीं सुखरूप राहिलेली चिमणी, आणि धर्मराजाबरोबर स्वर्गांत जाण्याइतका पुण्यवान् ठरलेला तो कुत्रा !

महाभारतांतल्या त्या साऱ्या प्रसंगांचीं आणि व्यक्तींचीं चित्रें माझ्या नजरेसमोरून पुढें सरकलीं. मनुष्यप्राण्याची सारी धडपड आणि सारी अगतिकता त्यांत होती. आणि त्यामागें एक वेडा पण निष्ठुर नियम होता. शंतनूची कामवासना अनिवार झाली, म्हणून भीष्मानें आपल्या साऱ्या इच्छांचा आणि वासनांचा होम करणें अवश्य होतें. दुर्योधनाच्या हृदयांत द्वेषाची भयंकर ज्वाला भडकली म्हणून हजारों माणसांना आपल्या रक्ताचें सिंचन करून ती विझवावी लागली. राजा धर्म एकदां खोटें बोलला, म्हणून सारें पांडवसैन्य अश्वत्थाम्याच्या सुडानें होरपळून जाणें अवश्य ठरलें.

महाभारत आणि त्या चतकोरभर कोरड्या जागेंत वळवळणारे कृमिकीटकांचें जग ! अगदीं निराळ्या प्रमाणावर आणि पातळीवर त्या दोन विश्वांची रचना झाली होती. आणि तरी त्या एकाच चक्राच्या साम्राज्याचे ते दोन भाग होते. उत्पत्ति आणि लय ! क्रिया आणि प्रतिक्रिया ! कर्म आणि त्यापासून मिळणारें अचूक फल !

' काफिरांचीं मुंडकीं आपल्या तलवारीनें उडवा ' असा आदेश अनुयायांना देणारा महंमद पैगंबर, आणि ' त्या तलवारीपुढें निर्भयपणें मस्तकें वाकवून उभे राहा 'असें सांगणारा महात्मा !

हळूहळू पावलें टाकीत मी स्टेशनाकडे परतलों; वाटेंत एक शेतकरी एक मेलेलें वासरूं हातांत घेऊन चालला होता. मला पाहून तो म्हणाला, " साहेब, हें वासरूं गाईपुढें चाटायला ठेवलें पाहिजे. नाहींतर ती सारखी हंबारत राहील आणि दूध द्यायची नाहीं. "

आपल्या मेलेल्या वासराला चाटणाऱ्या त्या गाईकडे पाहात-पाहात मी पुढें चाललों.

झेप घेणाऱ्या घारीपासून बचावण्याकरितां एक कोंबडी आपल्या पिलांना पंखाखालीं घेऊन बसली होती. आणि एक कोंबडें तोंडांत धरून कोल्हा भरदिवसां पळून जात होता.

पुढें भर गांवांत एक वेडी उघडीनागडी धांवत होती. तिनें एका तरण्या पोराला कवटाळलें आणि त्याचे पटापटा मुके घेतले.

मी स्टेशनवर आलों आणि तिकीट काढून गाडीची वाट पाहात बसलों. स्टेशनवर सगळा शुकशुकाट होता. एक म्हातारा पोर्टर चहांत पाव बुचकळून खात होता आणि एक कुत्रें आशेनें त्याच्या पायाशीं घोटाळत होतें. त्या पोर्टरनें कुत्र्याच्या पेकाटांत सणसणीत लाथ मारली आणि तें मोठमोठ्यानें केकाटूं लागलें—अगदीं भेसूरपणें ! त्याचें केकाटणें मुळीं थांबेच ना !

स्टेशनवर फिक्कट प्रकाशाचा धूर कोंदटला होता. आणि बाहेर अंधाराला महापूर आला होता. त्यांत अंधुक प्रकाशाचे ठिपके मधूनमधून तरंगत होते—महासागरांतल्या एकाकी गलबताप्रमाणें !

मुसळधार पाऊस कोसळत होता. उत्पत्तीच्या महायज्ञांत आहुतीवर आहुती पडत होत्या, इतक्या कीं तें होमकुंड विझतें कीं काय अशी धास्ती वाटूं लागली.

स्टेशनच्या छपरावरून चांदीच्या पागोळ्या गळत होत्या. तितक्यांत गाडी आली. चटकन् मी एका डब्यांत चढलों, आणि हेलकावे खात, हिंदकळत, गाडी वेगानें निघाली. माझ्या डब्यांत दारू पिऊन तर्र झालेले दोन इसम होते. ते मोठमोठ्यानें बरळत होते, हंसत होते, हातवारे करीत होते.

आणि मग एकदम काय झालें कोण जाणे ! त्या दोघांनीं परस्परांना कडकडून मिठ्या मारल्या आणि मोठमोठ्यानें गळा काढून ते रडूं लागले.

• • •

# आत्मा आणि परमात्मा : : ७

भय्यासाहेबांच्या मोटारचें शिंग वाजलें, त्यासरशी त्यांनीं पाळलेलीं चार कुलंगी कुत्रीं आणि दोन मोठाले कुत्रे आपल्या साखळ्यांना हिसके देत भुंकूं लागले. त्यांनीं एकच थैमान घातलें. पोपट पिंजऱ्यांत दांडीवरून पाळण्यांत आणि पाळण्यांतून खाली अशा उड्या मारूं लागला. त्या धांदलींत त्याचे पंख फडफडूं लागले आणि तोंडानें 'भय्यासाहेब, भय्यासाहेब' अशा हांका मारायला त्यानें सुरवात केली. दिवाणखान्यांत कोचावर वेटोळें घालून पडलेलें मांजर एकदम उभें राहिलें. आपली शेपटी फुगवून त्यानें अस्पष्टपणें म्यांव केलें. आणि मग उडी टाकून धांवत तें बाहेर गेलें आणि पायरीशीं घोटाळूं लागलें. माळ्यानें डोकीवरचें मुंडासें सारखें केलें आणि काढून ठेवलेल्या फुलांचा गुच्छ घेऊन तो पुढें धावला. नोकरांनीं बटनें दाबून पंखे सुरू केले आणि खिडक्यांवरचे पडदे भराभर बाजूला सारले. एकजण हातांत सिगरेटचा डबा घेऊन सज्ज झाला. दुसऱ्याच्या हातांत थंडगार पाण्यानें भरलेला भला मोठा जाड ग्लास होता. एक तरुण मोलकरीण दारांत उभी राहून जांभई देत होती. तिनें चटकन् तोंडावर हात ठेवला आणि ती पळाली. मग तिच्या लक्षांत आलें कीं मागील दारीं धांवत जाण्याऐवजीं आपण पुढील दारींच आलों. त्यामुळें ती लाजली आणि धांवत मागल्या दारीं जाऊन तिनें स्वयंपाकीणबाईला कडकडून चिमटा घेतला.

भय्यासाहेब मोटरमधून उतरले. ते उंच निंच होते. त्यांचें शरीर चांगलें स्थूल होतें. त्यांचा चेहेरा घवघवीत होता. पण त्याच्यावर तेज होतें.

त्यांच्या भुवया जाड होत्या, तसाच खालचा ओठहि जाड होता. आणि त्यांच्या ठाशीव फुगीर हनुवटीवर चांगली भली मोठी खळगी होती. त्यांचे डोळे बारीक तीक्ष्ण होते, आणि त्यांच्या सर्व व्यक्तिमत्वाशीं विसंगत अशी एक चमक त्या डोळ्यांत होती.

भय्यासाहेब पायऱ्या चढूं लागले तशीं तेथें घोटळणारें मांजर त्यांच्या पायांना घांसूं लागलें. तें पाहून कुत्रीं अधिकच चेवानें भुंकूं लागलीं आणि भय्यासाहेबांच्या सांगण्यावरून जेव्हां त्यांना नोकरांनीं सोडलें तेव्हां भय्यासाहेबांच्या अंगावर उड्या मारून त्यांनीं नुसतें थैमान घातलें. मग भय्यासाहेबांनीं आपल्या काठीनें पोपटाच्या पिंजऱ्याला हेलकावा दिला. तेवढ्यांत माळ्यानें फुलांचा गुच्छ पुढें केला. नोकर काठी आणि कोट हातांत घ्यायला धावले.

त्यांच्या ह्या स्वागतानें त्यांच्याबरोबर आलेले गणपुले वकील बावरून गेले. भय्यासाहेबांनीं तें पाहिलें; आणि दिवाणखान्यांतल्या कोचावर गणपुले वकिलांना बसवून ते गदगदून हंसले. आज अनेक वर्षें तें घर त्या दिलखुलास, गडगडाटानें पुनः पुन्हा भरून गेलें होतें. भय्यासाहेब आतां पन्नास वर्षांचे झाले होते, पण तें हास्य मात्र अजून ताजें होतें. वाऱ्याच्या झोतानें ज्याप्रमाणें सुकलेलीं पानें गळून पडतात त्याप्रमाणें त्या मुक्त हास्याच्या नादानें त्या घरांतली सारी कटुता आणि सारीं किल्मिषें साफ झालीं होतीं. त्या हास्यानें आजूबाजूच्या साऱ्या माणसांच्या आकसलेल्या वृत्तीवर प्रसन्नतेचा शिडकाव केला होता. त्या हास्यानें, आपल्या वृत्तींना दडपून शुष्क संतपण प्राप्त करून घेणाऱ्या आचार्यांना आणि गुरुजींना लाजवलें होतें. माणसाची जगण्याची आणि भोगण्याची सारी इच्छा आणि त्याचा सारा निर्भर आनंद त्या हास्यांतून व्यक्त होत होता. तें हास्य महाभारतांतल्या एखाद्या मनस्वी माणसाचें होतें, आजच्या किडलेल्या भारतीयाचें तें हास्य नव्हतें.

त्यांच्या त्या हास्यामुळें गणपुले वकील देखील हंसले. आणि मग आपल्या किरट्या हास्याची त्यांना लाज वाटली. त्या दोघांना बसलेले

पाहून नोकर पुढें झाले. खाण्यापिण्याचे जिन्नस त्यांनीं टेबलावर ठेवलें. भय्यासाहेबांनीं कुत्रीं, मांजर, पोपट ह्या सगळ्यांच्या पुढ्यांत खायचें टाकलें. गणपुले वकिलांना घ्या हो म्हणून म्हटलें आणि मग मागें रेलून त्यांनीं सिगारेटचा एक झुरका घेतला. ते कशाची तरी वाट पाहात होते. त्यांच्या त्या धवधवीत चेहऱ्यावर जरा काळजीची आणि विमनस्कतेची छटा दिसूं लागली. आणि जरा वेळानें तो एवढा खंबीर माणूस कावराबावरा झाला. त्यांच्या डोळ्यांतलें तेज एकदम मालवल्यासारखें झालें, कांहीं तरी प्रश्न विचारण्याकरितां ते एकदम आपल्या म्हाताऱ्या नोकराकडे वळले.

पण त्यांनीं प्रश्न विचारायच्या आधींच तो म्हातारा नोकर म्हणाला, " मंगलाताईंची तब्येत जरा बरोबर नाहीं. म्हणून त्या खालीं आल्या नाहींत."

भय्यासाहेब तट्कन् उठून उभे राहिले. चमत्कारिक स्वरांत ते एकदम खेंकसले, " बरें नाहीं ? मग ताबडतोब कळवलें कां नाहीं मला ? टेलिफोन कां नाहीं केला ? डॉक्टरना बोलवा आधीं ताबडतोब. अजून तुम्हीं त्यांना बोलावलें नसेलच ? "

त्यांची ती विचित्र वागणूक पाहून गणपुले वकील खायचे थांबले आणि आश्चर्यानें त्यांच्याकडे पाहूं लागले.

म्हातारा गडी हंसत म्हणाला, " तसें कांहीं विशेष होत नाहीं मंगलाताईंना. त्यांचें नुसतें डोकें जरा दुखतें आहे. "

ह्यावर भय्यासाहेब अधिकच रागावले आणि म्हणाले, " म्हणे फार कांहीं होत नाही. सुरवातीला सगळींच दुखणीं लहान असतात. नंतरच तीं मोठीं होतात. मलाच पाहून आलें पाहिजे तिला काय होतंय तें. " आणि ते वर जायला निघाले. गणपुले वकिलांना ते विसरून गेले.

तेवढ्यांत मंगला खालीं आली. ती तेराचौदा वर्षांची असेल नसेल. अत्यंत रेखीव, नाजुक असें तिचें सौंदर्य होतें. ती गोरी होती. आणि नेहेमीं आजारी पडत असल्यामुळें तिच्या चेहऱ्यावर एक विशिष्ट

तकाकी दिसत असे. आजारीपणामुळें तिच्या डोळ्यावर मात्र कांहीं परिणाम झाला नव्हता. सौम्य तेजानें ते नेहमीं चमकत असत.

नेहमीं आजारी पडण्याकरितां जीं माणसें जन्माला येतात त्यांतली मंगला होती. भय्यासाहेबांनीं मोठमोठ्या डॉक्टरांना तिला दाखवली होती. औषधांवर पाण्यासारखा पैसा खर्च केला होता. पण तिच्या प्रकृतींत विशेष सुधारणा कधींच झाली नव्हती. तशी सुधारणा जर कधीं होऊं लागली तर कांहीं ना कांहीं कारणानें तिला मोठें आजारीपण येई, आणि परत तिची प्रकृती अशक्तपणाच्या मूळपदावर येत असे.

असें असलें तरी आजारीपणाचे इतर परिणाम मात्र तिच्यावर झाले नव्हते. ती त्रासिक आणि किरकिरी झाली नव्हती. इतरांना त्रास देण्यांत आणि स्वतःच्या दुखण्याचा बडेजाव करण्यांत तिला मोठेपणा वाटूं लागला नव्हता. तिची वृत्ति स्वयंकेंद्रित झाली नव्हती. आजारीपणाचा तिच्यावर अगदीं उलटा परिणाम झाला होता. आजारीपणामुळें तिच्या मनांतलें सगळें मालिन्य जळून गेलें होतें. तिच्या वृत्तींत स्वार्थाचा आणि कटुतेचा अंशहि राहिला नव्हता. तिचें मन अगदीं स्वच्छ आणि प्रेमळ झालें होतें. आणि एक विलक्षण गोडवा तिच्या साऱ्या वृत्तींत भरून राहिला होता.

ती आली तशी भय्यासाहेबांच्या चेहेऱ्यावरची सारी काळजी आणि सारा त्रासिकपणा नष्ट झाला, आणि तीं कुत्रीं, तें मांजर आणि तो पोपट ह्यांनीं जें औत्सुक्य भय्यासाहेब आल्यावर दाखवलें होतें तेंच भय्यासाहेबांच्या चेहेऱ्यावर दिसूं लागलें. त्या क्षणीं त्या मांजराप्रमाणें त्यांना मंगलेच्या पायांत घोटाळतां आलें असतें तर ते घोटाळले असते. त्यांच्या चेहेऱ्यावरचा तो फरक पाहून मंगला हंसली. आणि आपल्या गोड आवाजांत ती म्हणाली, " बाबा, मी खालीं आले नाहीं म्हणून तुम्ही रागावलांत वाटतें ? "

तिनें त्यांच्या खांद्याला धरून त्यांना खालीं बसवलें. एखाद्या लहान मुलासारखें ते खालीं बसले आणि म्हणाले, " नाहीं ग ! मी तुझ्यावर कसा रागवेन ? पण तुला काय होतंय तें तरी सांग ? "

" माझें काय ! नेहमींचेंच आहे. त्याची नका तुम्ही करूं काळजी.

पण तुम्ही आतां दमून आलांत; आतां हें खा बरें तुम्ही.'' आणि मग एखाद्या प्रौढ बाईप्रमाणें तिनें भय्यासाहेबांना खाऊं घातलें. हें सगळें चालू असतांना ती गणपुले वकिलांशीं औपचारिकपणें बोलत होती. त्यांच्या घरच्या माणसांची चौकशी करीत होती.

भय्यासाहेबांचें खाणें संपल्यावर ती चतुर मुलगी हळूंच उठून जाऊं लागली. कारण गणपुल्यांबरोबर कांहीं बोलणें व्हायचें आहे तें तिनें ओळखलें. भय्यासाहेब तिला आडवीत म्हणाले, " चल, आपण डॉक्टरकडे जाऊं या. ''

ती हंसून म्हणाली, " पण माझें डोकें दुखायचें थांबलें आतां. '' आणि ती घरांत निघून गेली.

ती गेल्यावर गणपुल्यांचें आणि भय्यासाहेबांचें बोलणें सुरू झालें. गणपुले राजकारणांत पडलेले होते. नेहेमीं त्यांच्यावर कांहीं तरी जबाबदारी पडलेली असे. नेहेमीं त्यांची धावपळ चाललेली असे. ह्या सर्व गोष्टींना त्रासल्याचा ते नेहेमीं आव आणीत. पण ह्या गोष्टींशिवाय त्यांना क्षणभरहि चैन पडत नसे. भानगडी नसल्या तर ते त्या निर्माण करीत. समाजाचे सारे प्रश्न सुटले असते तर गणपुल्यांना जीवन असह्य झालें असतें; त्यांनीं आत्महत्त्या केली असती. त्यांच्या जीवनांतली ती मंगला होती.

गणपुल्यांचा असा विचार होता कीं भय्यासाहेबांनीं राजकारणांत पडावें. खरें म्हटलें म्हणजे त्यांना असें वाटे कीं, सगळ्याच माणसांनीं राजकारणांत पडावें,आणि सारखी धावपळ करीत रहावें. आणि मोठ्या कुशलतेनें लोकांना राजकारणांत ओढण्याचे ते डाव टाकीत असत. सध्यां त्यांचा डाव भय्यासाहेबांना राजकारणांत ओढण्याचा होता. भय्यासाहेबांनीं फक्त हो म्हणायला हवें होते. म्हणजे गणपुले त्यांना निवडणुकीला उभे करणार होते, सभा भरविणार होते, वर्तमानपत्रांतून वादविवाद करणार होते; एकच धांदल उडवून देणार होते.

व्याप वाढवण्यांतच घालविला होता. त्यांनीं खूप पैसा मिळवला होता आणि तितकाच खर्च केला होता. त्यांच्या मित्रांची आणि विशेषतः आश्रितांची संख्या सारखी वाढतच असे. आणि ती अशी वाढत आहे ह्याचा त्यांना फार अभिमान वाटत असे. हें सगळें पुरें होत नाहीं म्हणून कीं काय त्यांना जनावरें पाळायचा विलक्षण शोक होता. तीं जनावरें जर आजारी पडलीं तर ते एकच गोंधळ उडवून देत; आणि नोकरांवर वाटेल तसें संतापत. असें त्यांचें जीवन होतें.

मात्र ह्या गडबडीनें भरलेल्या जीवनाच्या मध्यभागीं एक प्रकारची शांतता होती; गर्दीचा आणि गडबडीचा अभाव होता. त्यांचें ज्या मुलीशीं लग्न झालें होतें ती अगदीं विचित्र स्वभावाची होती. ती तशी कणखर प्रकृतीची होती; पण काटकोळी होती. ती अगदीं घुम्या स्वभावाची होती. तिला कशांतच लक्ष घालावें असें वाटत नसे. कसलीच हौस तिला नव्हती. तिला हंसतांना कोणी क्वचितच पाहिलें असेल. तिचे दोन्ही ओठ नेहेमीं परस्परांवर दाबलेले असत. तिचा एकच उद्योग नेहेमीं चाललेला असे. तो म्हणजे विणकाम ! भय्यासाहेबांना जनावरांचें फार प्रेम होतें तर तिला त्यांचा फार तिटकारा वाटत असे. ती स्वार्थी होती अशांतला भाग नाहीं. पण तिनें आपल्या सगळ्या वृत्ती आकसून घेतल्या होत्या. जीवनाच्या प्रवाहाचा स्पर्श आपल्याला होऊं नये हीच तिची एक धडपड असे.

लग्न झाल्यावर पहिल्या रात्रीं जेव्हां भय्यासाहेबांनीं तिला प्रेमानें जवळ घेण्याचा प्रयत्न केला तेव्हां ती दूर सरकली. ती रात्र तशीच गेली. आणि मग अनेक रात्रीं तशाच गेल्या. आश्चर्यानें, दुःखानें, संतापानें भय्यासाहेब तिच्या त्या वर्तुणुकीकडे पहात राहिले. आणि मग एक दिवस तिनें जें देवाब्राह्मणांसमक्ष त्यांना देण्याचें कबूल केलें होतें तें त्यांनीं ज़बरदस्तीनें घेतलें.

त्यांनीं जें केलें त्याची त्यांना नंतर एकदम शिसारी वाटूं लागली. तिच्या थंड आणि परक्या शरीराचा स्पर्श त्यांना एखाद्या भुतानें केलेल्या

स्पर्शासारखा वाटूं लागला. त्यांना वाटलें की आपण कांहीं तरी दुष्कर्म केलें आहे. त्यांचें मन त्यांना खाऊं लागलें. परत ते आपल्या बायकोजवळ गेले नाहींत. परत कुठच्या स्त्रीजवळ आपल्याला जातां येईल असें त्यांना वाटेना. आणि ते त्यानंतर कुठल्याहि स्त्रीजवळ गेलेच नव्हते.

नव्हे त्यांचें सारें जीवनच मुळीं कांहीं दिवस थिजून गेलें.

त्यांच्या त्या चमत्कारिक संबंधांतून मंगला जन्माला आली होती. आणि आपल्याला नको असलेल्या संबंधांतून निर्माण झालेला त्या मुलीला जन्म देतांना त्यांची बायको मरण पावली होती. तिनें जी मुलगी मागें ठेवली होती ती अगदीं रोड आणि अशक्त होती. तिला अवश्य ते जीवनरस पुरविण्याचें त्या हट्टी चमत्कारिक बाईनें नाकारलें होतें. भय्यासाहेबांनीं त्या रोड मुलीकडे पाहिलें, आणि त्यांच्या हृदयांत विलक्षण प्रेम उचंबळून आलें. त्यांच्या मनांत जें कांहीं कोंडून राहिलें होतें तें एकदम भळभळा वाहूं लागलें. खडकाळ भूमीवर पडून देखील तग धरून राहिलेल्या त्या आपल्या बीजाविषयीं त्यांना विलक्षण जिव्हाळा वाटूं लागला. एखाद्या आईप्रमाणें त्यांनीं त्या मुलीला वाढवलें. त्या रोड मुलीच्या इच्छेप्रमाणें तो एवढा मोठा पुरुष वाकूं लागला. आणि आपलें स्वतःचें जीवन पुन्हां उत्साहानें हंसत जगूं लागला.

ती रोड मुलगी रोडच राहिली. तिचें खाणें, पिणें, हिंडणें, फिरणें वगैरे सगळें मर्यादितच राहिलें. जीवनांतला रस अनुभवण्याची ताकद तिच्या अंगांत कधींच आली नाहीं. आजारीपणानें तिची कधीं पाठ सोडली नाहीं. आणि तरी पण त्या मुलीनें जीवनाकडे कधीं पाठ फिरवली नाहीं. आनंद आणि जिव्हाळा तिच्या त्या दुबळ्या रोड जीवनांतून सारखीं झिरपत राहिलीं. आपल्या बापाच्या जीवनांत आपल्याला कांहीं विशेष स्थान आहे हें त्या मुलीनें लहान वयांतच ओळखलें. आणि तें स्थान भरून काढण्याकरितां ती आपलें सगळें दुबळेपण वेचूं लागली. दोन आत्म्यांचें एक विचित्र आणि दृढ नातें जमलें. त्या रोड मुलीच्या आत्म्यां-तून ठिबकणाऱ्या जिव्हाळ्यांतून भय्यासाहेबांच्या आत्म्यानें उदंड उत्साह

आणि आनंद प्राप्त करून घेतला, त्यांचें जीवन समृद्ध झालें. अस्थिर जीवनांत स्थिरता निर्माण झाली. अर्थात् नेहेमींप्रमाणें तात्पुरतीच.

मंगला जातांच गणपुले वकिलांनीं आपला विषय काढला. भय्यासाहेबांनीं मोकळ्या मनानें आपली मान्यता दर्शवली; आणि आनंदहि दर्शविला. कारण आपला आनंद लोकांपासून लपवून ठेवण्याची सभ्यता ते सुदैवानें शिकले नव्हते. नंतर दोघांनीं पुढचे बेत केले. बसल्या बसल्याच दोघांनीं धांवपळ केली. भय्यासाहेबांनीं पुन्हा पुन्हा आपलें निर्भर हास्य केलें. तें ऐकून वर आपल्या खोलींत बसलेल्या मंगलेलाहि हसूं आलें. असें थोडा वेळच चाललें.

एक नवी ईर्षा भय्यासाहेबांच्या जीवनांत पेटली. त्या ईर्षेमुळें जीवनांतल्या ज्या एका बाजूकडे भय्यासाहेबांनीं पाठ फिरविली होती; तिचें त्यांना अर्धवट दर्शन झालें. आणि त्यांना वाटलें कीं जीवनांतल्या एका मादक भर्जरी सौख्याला आपण पारखे झालों होतों आणि आतां तें सौख्य आपल्याला मिळणार आहे. त्यांच्या सर्व अंगभर गोड शिरशिऱ्या धांवल्या. तशा त्यांच्या अंगांतून किती दिवसांत धांवल्या नव्हत्या.

मग गणपुले त्यांच्या कानाशीं लागले, आणि कांहीं तरी कुजबुजले.

भय्यासाहेबांनीं डोळे विस्फारले आणि ते म्हणाले, " असें केलें पाहिजे म्हणतां ? "

गणपुले म्हणाले, " हो तर. तो तर आपला मुख्य डाव आहे. तो साधला म्हणजे आपलें अर्धें काम झालें. "

भय्यासाहेब अस्वस्थ झाले. आपली मान चोळूं लागले. त्यांच्या मनांत खळबळ उडाली. झगडा सुरू झाला.

ते म्हणाले, " आपल्याला हें बरें वाटत नाहीं बुवा. हें सगळें फसवेगिरीचें वाटतें. कोणावर तरी मागून हल्ला केल्यासारखें वाटतें. असें केल्याशिवाय नाहीं कां चालायचें ? "

गणपुले वकील म्हणाले, " भय्यासाहेब, तुम्ही चांगले अनुभवी

आणि व्यवहारी माणूस ! तुम्हीं असें बोलावें ह्याचें मला आश्चर्य वाटतें. राजकारण म्हणजे काय शाळेंतला नीतिपाठ वाटला कीं काय तुम्हांला ? राजकारणांत तर हें असें पदोपदीं करावें लागतें. सत्तेचा संबंध आहे ना तिथें ! ”

भय्यासाहेब म्हणाले, “ सत्ता ! सत्ता ! ” आपल्या हातांचीं बोटें त्यांनीं कुस्करल्यासारखीं केलीं. आपण गुदमरत आहोंत असें त्यांना वाटलें. आपल्यावर जुलुम होत आहे असें त्यांना जाणवूं लागलें.

गणपुले वकील म्हणाले, “ फार चान्स मिळतोय् तुम्हांला भय्या-साहेब. तो सोडण्याचा वेडेपणा करूं नका. ”

भय्यासाहेब आपल्या हातांचीं बोटें कुस्करत नेभळटपणें हंसत म्हणाले, “ जरा विचार करूं द्या मला. गणपुले, हें सगळें नवीन आहे मला. रात्रीं टेलिफोन करून कळवतों मी तुम्हांला. ”

गणपुले वकील निघून गेले आणि भय्यासाहेब विचारमग्न स्थितींत येरझारा घालूं लागले. त्यांना वाटत होतें कीं आपण फार जुलूम सहन केला. विनाकारण आपण ह्या रेशमी जाळ्यांत सांपडलों. हें जाळें तोडून टाकलें पाहिजे. मुक्त झालें पाहिजे. आणि जीवनाच्या ज्या भागाचें त्यांना अस्फुट दर्शन झालें होतें त्यांतली सगळी मौज लुटावी.

पायांत तडफडणाऱ्या मांजराला त्यांनीं लाथेनें दूर केलें, आणि मग शांतपणें ते कोचावर बसले. त्यांच्या मनाचा काय तो निश्चय झाला होता. आपण तोडून टाकलेल्या त्या रेशमी जाळ्याकडे ते पहात होते.

तेवढ्यांत ती तरुण देखणी मोलकरीण तेथें आली. आणि भय्या-साहेबांच्या पुढच्या बशा वगैरे उचलूं लागली. अगदीं सावकाश तिचें काम चाललें होतें. भय्यासाहेबांचें लक्ष तिच्या बोटांकडून तिच्या दंडाकडे गेलें. चोळीकडे गेलें आणि मग त्यांना असें दिसलें कीं दोन गहिरे डोळे आप-ल्याकडे चोरून पाहात आहेत. ते डोळे चटकन् दुसरीकडे पाहूं लागले. भय्यासाहेबांची नजर पुन्हा वर झाली. नजरेला नजर भिडली. दोन्ही नजरा

मोहित झाल्याप्रमाणें परस्परांवर रोखलेल्या राहिल्या.

भय्यासाहेबांचीं कानशिलें भणभणूं लागलीं. त्यांचें शरीरांत खोल कुठें तरी ठोके पडूं लागले, त्यांना वाटलें कीं आपल्या शरिरांतले हे ठोके नव्हतें. हे साऱ्या विश्वाच्या हृदयाचें स्पंदन आहे. लाल पिवळ्या रंगांच्या द्रवांचा पूर आला आणि तीं द्रव्यें परस्परांत मिसळून गेलीं. पुन्हा पुन्हा मिसळत राहिलीं.

भय्यासाहेबांच्या कानशिलाला पदराचा वारा लागला. भय्यासाहेब आवेगानें उठले. आणि—आणि तडक ते मंगलाकडे गेले. आपण हें असें काय करतोय् तें त्यांना समजेना. आपण तें रेशमी जाळें तोडून टाकलें आहे असें ते स्वतःला सांगूं लागले. पण व्यर्थ !

मंगला झोपली होती. ती भय्यासाहेबांना पाहून उठून बसली आणि हंसली. आणि तिच्या त्या हास्यामुळें भय्यासाहेबांच्या अंतरंगांतली खळबळ एकदम शांत झाली. ज्या एका अनुभवाच्या उंच कललेल्या आणि निसरड्या पातळीवर ते गेले होते तेथून ते एकदम नेहमींच्या अनुभवाच्या सपाट जमिनीवर उतरले. आपला तोल जात आहे असें जें त्यांना वाटत होतें तें वाटेनासें झालें. त्या बहकलेल्या बेभान झालेल्या भय्यासाहेबांची त्यांना ओळख पटेना.

मंगलेला ते म्हणाले, " कां ग ? झोपली होतीस ? अजून बरं नाहीं वाटलं वाटतं ? "

ती म्हणाली, " तुम्ही माझ्याजवळ बसा आणि बोला. म्हणजे मला बरें वाटेल. "

भय्यासाहेब तिच्याजवळ बसले आणि दिवसभरांतल्या सगळ्या हकिकती त्यांनीं तिला सांगितल्या. ते जें जीवन जगले; तें ती कल्पनेनें जगूं लागली. तिच्या चेहेऱ्यावर टवटवी आली. तिच्या वृत्ती पालवल्या. तिला बरें वाटलें. एक कृतज्ञ दृष्टिक्षेप तिनें भय्यासाहेबांकडे फेकला.

त्या दृष्टिक्षेपामुळें भय्यासाहेबांच्या ध्यानांत आले कीं तिला आणि

आपल्याला जोडणारा दुसरा एक धागा आहे. आपलें जीवन ती जगतें आणि जर तिच्या वृत्तीला मानवणार नाहीं असें जीवन आपण जगलों तर ती कोमेजून जाईल.

कोमेजून जाईल ! त्या नुसत्या कल्पनेनेंच ते विद्ध झाले. जीवनाचे ते थेंब ठिबकत राहिले नसते तर त्यांच्या जीवनाचा सारा ओघच सुकून गेला असता.

रात्रीं त्यांनीं गणपुल्यांना टेलिफोन केला कीं आपल्याला कांहीं तसें वागणें जमणार नाहीं. आणि गणपुले कांहीं बोलणार इतक्यांत त्यांनीं टेलिफोन बंद केला.

कांहीं दिवस तसेच गेले. आणि मग अस्थिर जीवनांत जी स्थिरता आली होती ती नष्ट झाली. त्या रोड आजारी मुलीनें एक दिवस भय्यासाहेबांच्या मांडीवर डोकें ठेवून प्राण सोडला.

भय्यासाहेब वेड्यासारखे धांवत सुटले; जमिनीवर गडबडा लोळले; जिव्हारी जखम झालेल्या जनावरानें जसें करावें तसें त्यांनीं केलें. पिसाळल्यासासारखें त्यांचे डोळे दिसूं लागले. रडणें आवरण्याकरितां त्यांनीं तोंडांत धोतराचा बोळा कोंबला. आणि बिछान्यावर ते पडून राहिले. पण वेदनेचा एवढा लोट त्यांच्या शरीरांतून वाहात गेला की ते ताडकन् उभे राहिले. आणि पुन्हां धाडकन् आपल्या बिछान्यावर पडले. त्यांनीं आपलें डोकें ताडताड भिंतीवर आपटून घेतलें.

असें भयंकर त्यांचें दुःख होतें. नुसते कोणी प्रिय माणूस आपल्याला सोडून गेलें म्हणून झालेलें तें दुःख नव्हतें. तर आपल्या शरीराचा कोणी लचकाच तोडून नेला आणि आपल्याला कायमचें पांगळें केलें म्हणून झालेलें तें दुःख होतें. त्यांना असें आढळून आलें कीं ते जें घटनांनीं आणि आनंदानें भरलेलें जीवन जगत होते, तें खरोखर त्यांचें जीवन नव्हतेंच. तीच त्यांचें जीवन जगत होती. ती रोड आणि आजारी मुलगी त्यांचें जीवन जगत होती. आणि त्यांना आतां आपलें जीवन जगणें शक्य नव्हतें. त्यांचा आत्माच त्यांना सोडून गेला होता.

भय्यासाहेब भयंकर चिडले, संतापले, ईश्वरानें आपल्यावर असा प्रसंग आणावा ह्या गोष्टीची चीड त्यांच्या मस्तकांत भिनली. त्या ईश्वरा· वर सूड घेण्याचा त्यांनीं निश्चय केला. आयुष्यांत ज्या गोष्टी त्यांनीं कधीं केल्या नाहींत त्या करण्याची त्यांनीं प्रयत्न केला. व्यसनी होण्याचें त्यांनीं ठरवलें. गणपुले वकिलाना जें करण्याबाबत त्यांनीं नकार दिला होता तें करण्याची त्यांनीं तयारी दर्शवली. पण हे सगळे त्यांचे प्रयत्न व्यर्थ गेले. ह्यांतलें त्यांना कांहींच जमेना. कारण तसें केल्यानें आपल्या जीवनांतला भकासपणा यत्किंचित्‌हि कमी होणार नाहीं ह्याची त्यांना बालंबाल खात्री होती.

अखेर संतापाच्या भरांत त्या तरण्या देखण्या मोलकरणीला त्यांनीं आपल्या खोलींत खेचलें आणि दार बंद करून घेतलें. तिचा खोटा कांगावा त्यांनीं दमदाटी करून बंद केला, आणि...

...आणि ते हतबुद्ध झाले. जें त्यांना करायचें होतें तें त्यांना जमेना. भकास मुद्रेनें ते तिच्याकडे पाहात राहिले. आश्चर्यानें तिनें त्यांच्या कडे पाहिलें. छद्मीपणानें ती हंसली. विचित्र नजरेनें त्यांच्याकडे पाहात ती निघून गेली आणि त्या रात्रीं तिच्यावर फिदा असलेल्या एका ड्रायव्हरला तिनें आपला ज्वानीचा बहर लुटूं दिला.

भय्यासाहेबांचें जीवन शुष्क, एकाकी होऊन गेलें. कामधंदा त्यांच्या हातून होईना. आपला परिवार त्यांना सांभाळतां येईना. कुत्र्या मांजरांचें कौतुक करतां येईना. जीवन क्षणभर मागें पाहात त्यांच्याकरितां थांबलें आणि पुढें निघून गेलें.

भय्यासाहेब आणि त्यांचा तो म्हातारा नोकर असे दोघेच त्या घरांत राहूं लागले. भय्यासाहेब रोड झाले. भलामोठा धिप्पाड असा तो मनुष्य लहानशा लाकडाच्या मोळीसारखा दिसूं लागला. त्यांच्या मानेच्या शिरा उठून दिसूं लागल्या. त्यांच्या आंगावरची कातडी सुरकुत्या पडून लोंबूं लागली. त्यांचे डोळे गढूळ, निर्जीव झाले. अहिल्येची जशी शिळा झाली होती; तसें त्यांचें झालें.

असे कित्येक दिवस गेले. भय्यासाहेब कधीं विचार करीत कीं हे

असें कां झालें ? आपण सारें जीवन असें दूर कां ढकलून दिलें ? त्या रोड आजारी मुलीची आपल्याला कां एवढी पत्रास वाटली ?

आतां त्यांना जीवन जसें परकें वाटत होतें तशी मंगला देखील परकी वाटत होती. तिला आपण इतकें महत्त्व दिलें हें त्यांना मूर्खपणाचें वाटलें. आपण सगळें दूर लोटलें ह्याचें त्यांना वाईट वाटूं लागलें. त्या दुबळ्या माणसाला उगीचच रडूं येई.

अखेर एक दिवस भय्यासाहेबांनीं आपली सारी इच्छाशक्ती एकवटली आणि आपल्या म्हाताऱ्या गड्याला एक कुत्र्याचें पिलूं आणायला सांगितलें. गडी कुत्र्याचें पिलूं घेऊन आला. तें धावूं लागलें, पडूं लागलें, केकाटूं लागलें.

भय्यासाहेब उत्साहानें उठले आणि एक काडी त्या कुत्र्याच्या पोरापुढें हलवून ते त्याला खेळवूं लागले. तें पिलूं देखील खेळूं बागडूं लागलें. पण त्याला तसें खेळतांना पाहून आनंद होण्याऐवजीं त्यांच्या डोळ्यांतून घळघळा पाणीच वाहूं लागलें. भय्यासाहेब ओक्साबोक्शीं रडूं लागले.

तें पाहून तो म्हातारा नोकर कुत्र्याचें पोर घेऊन जाऊं लागला. पण भय्यासाहेबांनीं त्याला तसें करूं दिलें नाहीं. त्या पिलाला कुरवाळीत ते रडत राहिले.

त्यानंतर भय्यासाहेबांनीं अंथरुणच धरलें. आणि पुष्कळ दिवस झिजल्यावर अखेर एक दिवस त्या बागडणाऱ्या कुत्र्याच्या पिलाकडे डोळे ताणून पाहण्याचा प्रयत्न करीत करीत त्या आत्मा हरवलेल्या माणसानें आपला प्राण सोडला.



## उज्वल परंपरा : : ८

सर सीताराम, हायस्कूलची वयस्क इमारत आपल्या दगडी गांभीर्याच्या आणि चौकोनी भारदस्तपणाच्या ऐटींत उभी होती. शाळेच्या नांवाच्या भल्या मोठ्या पाटीवर मध्यभागीं शाळेचा शिक्का होता, आणि त्यावर एका संस्कृत सुभाषिताची कमान होती. अर्थातच त्या सुभाषिताची अशी कमान करतांना सुभाषिताचा अर्थ लवचिक असतो, असें सुचविण्याचा चावट हेतू शाळेच्या पहिल्या ड्रॉइंगमास्तरांच्या मनांत नव्हता. सरळ रेषेपेक्षां वक्ररेषा अधिक सुबक दिसते हा चित्रकलेचा नियमच फक्त त्यांच्या मनांत असावा.

प्रवेशद्वाराजवळ पन्नास हजार रुपयांची देणगी देऊन शाळेला कायमची उपकृत करणारे सर सीताराम यांचा अर्धपुतळा होता. त्यांच्या संगमरवरी चेहऱ्यावरचा भाव इतका सात्विक होता कीं दूधभात आणि मोसंब्याचा रस ह्याव्यतिरिक्त त्यांनीं कांहीं सेवन केलें असावें असें वाटत नव्हतें. सर सीताराम ह्यांच्या पुतळ्याइतकाच, नव्हे कांकणभर सरसच उठावदार दिसणारा शाळेचा भरजरी पट्टेवाला समोरच्या बाजूला बसलेला असे. त्यानें दिलेल्या घंटेच्या टोल्याबरहुकूम साऱ्या शाळेचे व्यवहार चालत असत. कालिदासाच्या श्लोकांचें आणि युक्लिडच्या प्रमेयांचें त्या घंटेच्या टोल्यानें अनेकवार तुकडे पाडलेले होते. ह्याच्या उलट हेडमास्तरांची चिमुकली घंटी त्या पट्टेवाल्याच्या हातांतील तपकिरीच्या चिमटीची आणि त्याच्या नाकपुडीची अनेकदां फारकत घडवीत असे. असें होणें वाईट असलें तरी अपरिहार्य होतें. कारण हेडमास्तरांच्या घंटीचा किणकिणाट आणि पट्टेवाल्याच्या घंटेचा घणघणाट ह्यांच्या तालावर

त्या चिमुकल्या विश्वाचें जीवन सुरळीतपणें चालत असे.

चुना लावून पांढऱ्या शुभ्र केलेल्या शाळेच्या भिंतींवर ज्ञानेश्वरांपासून गांधींपर्यंत अनेक महापुरुषांचे फोटो सोईनुसार लावलेले होते. काटकुळा गुडघा पोटाशीं घेतलेला नाना फडणवीस, रागाच्या झटक्यानें ज्याच्या टोपीचा तुरा मागें हवेंत उडत आहे असा रागीट संभाजी, हुदगीसारखी चक्री पगडी घातलेले विष्णुशास्त्री चिपळुणकर वगैरे अनेक थोर थोर माणसें तेथें निमूटपणें खिळ्यांना लटकत होतीं. ज्यांनीं जन्मभर मोठमोठ्या उलाढाली केल्या त्यांना इतकें निरुपद्रवी बनविणाऱ्या शाळेची शिस्त किती वाखाणण्यासारखी असली पाहिजे तें निराळें सांगायला नकोच.

महापुरुषांप्रमाणें त्यांचीं सुभाषितदेखील निरनिराळ्या वर्गांतून लटकावलेलीं होतीं. तीं पाहून कोणालाहि असें आश्चर्य वाटलें असतें कीं, इतक्या सुंदर शब्दांत व्यक्त केलेल्या एवढ्या शहाणपणाचा वारसा माणसाला मिळालेला असतांना तो इतका मूर्ख राहिला तरी कसा ? आणि एखाद्या चावट माणसाला असेंहि सुचलें असतें कीं, शहाणपणाचें असें अजीर्ण झाल्यावर माणसाचा मूर्खपणा वाढावा ह्यांत कांहीं नवल नाहीं.

शिक्षणाच्या विविध आणि विचित्र उपकरणांची तर सिताराम हायस्कूलमध्यें एवढी जय्यत तयारी होती कीं, युद्ध पुकारणाऱ्या राष्ट्रां-जवळदेखील शस्त्रास्त्रांची एवढी तयारी नसेल. चित्रें, तक्ते, नकाशे, निरनिराळीं मॉडेल्स, भूगोल वगैरे वस्तूंचीं कपाटें ठिकठिकाणीं ठेवण्यांत आलीं होतीं.

आणि तितक्याच व्यवस्थितपणें वर्गांत मुलें आणि मास्तर मांडून ठेवले होते. व्यवस्थित कव्हरें घातलेल्या वह्यांसारखीं आपल्या शाळेंतील मुलें असावीं असा सर सीताराम हायस्कूलच्या मुख्याध्यापकांचा कटाक्ष असे.

श्री. ढब्बू हे सर सीताराम हायस्कूलचे हेडमास्तर. वीसपंचवीस वर्षें त्यांनीं इमानें इतबारें सर सीताराम हायस्कूलमध्यें मास्तरकी केली

होती. वर्षानुवर्षे, आयुष्यांत आपण पहिल्यांदाच मांजर पहात आहोंत अशा थाटांत त्यांनीं 'This is a cat' हें वाक्य पहिलीला शिकवलें होतें. हिंदुस्थानचा नकाशा नीट काढतां यावा म्हणून ज्या गमतीदार युक्त्या योजाव्या लागतात त्या त्यांनीं पुन्हा पुन्हा सप्रयोग मुलांना शिकविल्या होत्या. आणि त्यामुळें सर सीताराम हायस्कूलमधील विद्यार्थ्यांचे दहा मार्क अगदीं Secure झालेले होते. जॉमेट्रीच्या रायडर्सनीं भरलेल्या तीन मोठाल्या वह्या त्यांच्याजवळ होत्या. त्या वह्यांत कुठच्याहि मुलानें विचारलेल्या कठीण रायडर्सचीं उत्तरें सांपडत असत. गल्फस्ट्रीम कसा वाहतो तें डोळे मिटूनदेखील नकाशांत दाखविण्याचें कसब त्यांच्या अंगीं होतें. मनुष्याच्या शरीरांतल्या पांढऱ्या पेशी व रोगजंतु ह्यांच्या ज्या रोमांचकारी चकमकी होतात त्यांचें रसभरित वर्णन ते रंगीत खडूंचें साहाय्य घेऊन करीत असत. बी. टी. आणि एस्. टी. सी. हीं शेपटें त्यांनीं स्वतःच्या नांवापुढें केव्हांच चिटकवलीं होतीं. मुलांना जें सरळपणें शिकवतां येईल तें आडवळणानें शिकवणारी डायरेक्ट् मेथड् वापरण्यांत त्यांचा हातखंडा झालेला होता. इन्स्पेक्शनच्या बांक्या प्रसंगीं मुलांना कसें 'तयार' करून ठेवायचें तें त्यांना बरोबर माहीत होतें.

एकंदरींत वीस वर्षांच्या अनुभवानें श्री. ढब्बू हे मोठे वाकबगार मास्तर झालेले होते. आणि आतां अलिकडे चार वर्षें हेडमास्तरकीची धुरा त्यांच्यावर टाकण्यांत आली होती. पालक, शिक्षणखातें, पुस्तकाविक्रेते, मॅजिक लँटर्न दाखविणारे जादूगार, वगैरे अनेक प्रकारच्या माणसांशीं त्यांचा संबंध येत असे. केवढा तरी मोठा पत्रव्यवहार त्यांना संभाळावा लागे. पण तें सारें काम अत्यंत विचारपूर्वक आणि दक्षपणें श्री. ढब्बू करीत असत.

हेडमास्तरनीं अर्धा तास उशीरां यायचें ही सर सीताराम हायस्कूलची फार जुनी परंपरा होती, आणि इतर अनेक परंपरांप्रमाणें ही परंपरा देखील श्री. ढब्बूंनीं मोठ्या निष्ठेनें आणि आदरानें चालविली होती. खरें म्हटलें म्हणजे शाळेंत असें उशीरां जाणें त्यांना आवडत नसे. शाळे-

वर त्यांचें फारच प्रेम होतें, आणि आपल्या गैरहजेरींत शाळेवर अनेक संकटें एकदम कोसळतील अशी त्यांना फार फार धास्ती वाटत असे. शाळेच्या खिडक्यांच्या कांचा कोणी दगड मारून फोडील, शाळेच्या तिजोरींतील पैसे चोरीला जातील, शाळेला अचानक इन्स्पेक्टर भेट देतील वगैरे अनेक शंकाकुशंका त्यांना भंडावून सोडीत असत. कितीदां तर त्यांना रात्रीं जाग येत असे आणि ताबडतोब पळत पळत शाळेंत जावें व सगळें व्यवस्थित आहे ना तें पाहून यावें असें वाटत असे. पण मोठ्या निश्चयानें ते ही इच्छा आंवरीत असत. सकाळीं जेवण झाल्यावर तर त्यांचें मन फारच अस्वस्थ होत असे. ते जोरजोरांत येरझारा घालीत आणि दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांत अडकवून तीं डोक्यावर ठेवीत असत. पण सर सीताराम हायस्कूलच्या हेडमास्तरांनीं अर्धा तास उशीरां जायचें हा प्रघात मोडण्याचें धैर्य त्यांना कधींच झालें नाहीं.

त्यामुळें साडेअकराला एक मिनिट असतांना ढब्बू मास्तर शाळेच्या आवारांत येत असत आणि बरोबर साडेअकरा वाजतां ते आपल्या खुर्चींत बसलेले असत, आणि रात्रीं कितीहि उशीर झाला तरी आपलें काम आटोपून घरीं जाण्याचें त्यांच्या फार जिवावर येत असे. अशी श्री. ढब्बू यांची कर्तव्यतत्परता होती. असें त्यांचें सर सीताराम हायस्कूल-वर निरातिशय प्रेम होतें.

श्री. ढब्बू खुर्चीवर बसले आणि साऱ्या खोलीवर भारदस्तपणाचा ठसा उमटला. श्री. ढब्बू यांनीं टेबलाची कडा आणि आपलें पोट ह्यांमधील अंतर सोईस्करपणें बदलून घेतलें. टेबलावरील दौती आणि टाकांचा स्टॅन्ड ह्यांमधील बिघडलेला कोन पुन्हा सारखा केला. शिपायानें तारीख बदलली आहे कीं नाहीं त्याची नजर वळवून तपासणी केली. आपल्या मुलीच्या पदराकडेदेखील जुन्या वळणाची आई इतक्या कांटेकोरपणें पहात नसेल.

सारें कांहीं व्यवस्थित आहे असें ध्यानांत येतांच श्री. ढब्बूंनीं समाधानपूर्वक आपल्या मिशा गोंजारल्या. शाळेची उज्वल परंपरा आपण तशीच प्रज्वलित ठेवल्याच्या आनंदानें त्यांचा घवघवीत चेहेरा उजळला.

भिंतीवरच्या संस्कृत सुभाषितांकडे त्यांनीं अभिमानानें पाहिलें आणि मग टेबलावरचीं पत्रें ते काळजीपूर्वक उघडूं लागले.

एकीकडे पत्रव्यवहार पहात असतांना शाळेंत काय चाललें आहे इकडे त्यांचें लक्ष होतेंच. बिघडलेल्या मोटारीच्या आणि चालू मोटारीच्या आवाजांत जसा फरक असतो, तसा मास्तर असलेल्या आणि नसलेल्या वर्गांतून येणाऱ्या आवाजांतहि फरक असतो हें ढब्बू मास्तरना इतक्या वर्षांच्या अनुभवावरून माहीत होतें. त्यामुळें बसल्या बसल्याच आसपासच्या वर्गांत मास्तर आहेत कीं नाहींत तें त्यांच्या ध्यानांत आलें. समोरच्या कांचेच्या कपाटांत पाहून मागल्या बाजूला बसलेली कारकून मंडळी काम करीत आहे कीं नाहीं तें त्यांना समजलें. टीचर्स रूममधून येणारे आवाज सगळे तास नसलेल्या मास्तरांचेच होते. भूगोलाच्या तासाकरितां लागणारे नकाशे स्टॅन्डवर नव्हते. टेबलावर इंग्रजी निबंधांच्या वह्या होत्या. हजेरीबुकांत सगळ्या मास्तरांच्या सह्या होत्या. सगळें कांहीं अगदीं व्यवस्थित आणि सुरळित होतें. चुका नसलेल्या शुद्धलेखनासारखें होतें.

मध्येंच हेडमास्तरनीं कारकुनाला हांक मारली.

' मोघे ! अहो मोघे ! इकडे या बरें जरा.'

'आलों' मोघे म्हणाले, आणि आपल्या कोरीव कांतीव अक्षरांत मुलाचें लीव्हिंग सर्टिफिकेट भरूं लागले. सावकाशपणें आणि व्यवस्थितपणें त्यांनीं आपलें काम पुरें केलें. मग त्यांनीं टेबलावरची टापटीप मनाजोगती केली आणि प्रश्नार्थक चेहेऱ्यानें ते ढब्बू मास्तरांच्या समोर आले.

मोघ्यांचा हा गुण श्री. ढब्बू ह्यांना फार आवडत असे. असें सावकाश व धिम्मेपणानें काम करणारीं माणसें त्यांना आवडत असत. चटकन् काम आटपणाऱ्या माणसांचा त्यांना राग येत असे. संशय दाटत असे. अशीं माणसें बेजबाबदार आणि हलगर्जी असतात, असें त्यांचें ठाम मत होतें. त्यांच्यावर ते कधींहि विश्वास टाकीत नसत.

अशा प्रकारचीं माणसें श्री. ढब्बू ह्यांच्या हाताखालीं होतीं. मोठाले हिशोब तोंडींच करून चटकन् उत्तर देणारे एक गणिताचे मास्तर होते.

कुठेंहि चटकन् टॅक्सींतून जाऊन काम उरकून येणारे सायन्सचे मास्तर होते. चारआठ दिवसांत गॅदरिंगची व्यवस्था करूं शकणारे इंग्लिशचे मास्तर होते. पण ह्या सगळ्यांविषयीं ढब्बूंना अविश्वास वाटत असे. अर्थातच सर सीताराम हायस्कूलच्या उज्वल परंपरेप्रमाणें ते मास्तर-वर्गाशीं फार सभ्यतेनें वागत असत. अंगावर खेंकसणें, टाकून बोलणें वगैरे गोष्टी त्यांनीं कधींहि केल्या नाहींत. पण तरीदेखील शक्य तों ते अशा मास्तरांना चापत असत, त्यांच्या उत्साहाला लगाम घालीत असत. ह्याबद्दल त्या मास्तरांची होणारी कुरबूर ढब्बूंच्या कानांवर आली नव्हती अशांतला भाग नाहीं. पण तिकडे दुर्लक्ष करण्याइतका मनाचा मोठेपणा ढब्बूंच्या अंगीं मूळचा नसला तरी, सर सीताराम हायस्कूलच्या उज्वल परंपरेमुळें त्यांना अंगांत बाणवावा लागला होता.

असो. श्री. ढब्बू मोघ्यांना म्हणाले,' हे पहा मोघे, आपल्याला ह्या वर्षीं लायब्ररीकरितां कपाटें घ्यायचीं आहेत.'

' म्हणजे नवीन करून घ्यायचीं आहेत कां ?' मोघे मुद्याचा विचार करांत म्हणाले.

' अगदीं नवीन घ्यायचीं असेंहि नाहीं. आणि जुनीं घ्यायचीं असेंहि नाहीं.' ढब्बूंनीं फोड केली.

' म्हणजे कांहीं नवीन घ्यायचीं आणि कांहीं जुनीं, असें कां ?' मोघे मुद्दा आपल्याला समजला हें दर्शविण्याच्या हेतूनें म्हणाले.

त्यामुळें अर्थातच ढब्बूंच्यावरची स्पष्टीकरणाची जबाबदारी बरीच वाढली. ' अं हं. तसें नव्हे मोघे, नवीं घ्यायचीं कीं जुनीं घ्यायचीं हें आपणच ठरवायचें आहे.'

' असें असें, म्हणजे आपणच हें ठरवायचें आहे.' मोघ्यांनीं मुद्दा आपल्या मनावर ठसवण्याकरितां त्याचा पुन्हां उच्चार केला.

' शक्यतों आपण घ्यायचीं तीं नवीनच. शाळेकरितां वस्तू घ्यायची ती नवीनच पाहिजे. वर्षानुवर्षें टिकायची असते ती.' ढब्बूंनीं विचार-

विनिमयांत एक पाऊल पुढें टाकलें

' हो हो, शाळेंत काय किंवा घरांत काय ! एकंदर नवीनच वस्तू घेतलेली बरी.' मोघ्यांनीं ढब्बूंच्या विधानाला सर्वसाधारण रूप देण्याचा प्रयत्न केला.

आपल्या विधानांत करण्यांत आलेला हा फरक ढब्बूंना रुचला नाहीं. आणि घरगुती खरेदी व शाळेकरितां केलेली खरेदी ह्यांतल्या फरक त्यांनीं सावकाशपणें विशद करायला सुरवात केली.

मोघ्यांनीं त्यांचें बोलणें ऐकून घेतलें. आणि मग तितक्याच सावकाशपणें व स्वतःचें म्हणणें व त्यांचें म्हणणें ह्यांत मुळींच फरक कसा नाहीं तें ते समजावून सांगूं लागले. अशा रीतीनें त्या विषयावर सुमारें तासभर चर्चा झाली, आणि लायब्ररीकरितां नवीन कपाटें घेतलीं पाहिजेत एवढा महत्त्वाचा निर्णय घेण्यांत आला. आपण इतकें काम केल्यामुळें श्री. ढब्बू ह्यांना फार संतोष वाटला. आपल्या मिशा त्यांनीं गोंजारल्या आणि भिंतीवरच्या संस्कृत सुभाषितांकडे अभिमानानें पाहिलें.

नंतर आपल्या हातांची पाठीमागें जुडी करून ते वर्गांची पहाणी करण्याकरितां बाहेर पडले. सावकाशपणें दोन्ही बाजूंना पहात ते चालूं लागेल. एका वर्गांत एक मास्तर शिकवीत होते. ढब्बूंनीं त्यांचें शिकवणें थोडा वेळ ऐकलें आणि त्यांच्या कपाळावर आंठ्या पडल्या. ते वर्गांत गेले. त्यांनीं मुलांना प्रश्न विचारले. आणि मग आपल्या पद्धतीनें ते मास्तर शिकवित असलेला मुद्दाच पुन्हा शिकवला. आणि मग त्यांना वर्गाच्या बाहेर घेऊन त्यांनीं एक मोठा सिद्धांत सांगितला.

'Teach less, so that the students will learn more.'

ढब्बूंचें हें मोठें आवडतें वाक्य होतें. आणि शाळेंत नवीन नोकरीला लागलेल्या प्रत्येक मास्तरला हें वाक्य ऐकवायला ते अगदीं टपलेले असत. तें वाक्य सांगितल्यावर त्यांनीं त्या मास्तरना तासानंतर आपल्याला भेटायला सांगितलें, आणि त्यांना एक लांबलचक व्याख्यान ऐकविण्या-

करितां ते मनांत विचारांची जुळवणी करूं लागले.

इतक्यांत त्यांच्या हेडमास्तरच्या दृष्टीस एक मुलगा भिंतीवर चित्र काढतांना दिसला. तें पाहून त्यांचा संताप नुसता उसळून आला. पोरगा नुसता शाळेच्या भिंती खराब करीत नव्हता, तर सर सीताराम हायस्कूलच्या परंपरेला काळिमा फांशीत होता. भिंतीवर टांगलेल्या सगळ्या महापुरुषांच्या स्वर्गस्थ आत्म्यांना डागण्या देत होता. हेडमास्तरला न शोभणाऱ्या चपळाईनें ते पुढें झाले आणि त्यांनीं त्या पोराचा दंड पकडला. त्या मुलाच्या तोंडांत मारायला त्यांचे हात नुसते शिवशिवत होते. 'हरामखोर' ही महाभयानक शिवी त्यांच्या तोंडाशीं आली. पण सर सीताराम हायस्कूलच्या परंपरेनें त्यांच्या तोंडावर हात ठेवला. त्यांच्या बी. टी. च्या शिक्षणानें त्यांचा हात धरला. अशाच एका प्रसंगीं सर सीताराम हायस्कूलच्या एका जुन्या हेडमास्तरनीं एका मुलाच्या कानशिलांत मारली होती आणि त्याला शाळेंतून हांकून लावलें होतें. पण तो जुना काळ होता. आतां तसें करणें योग्य नव्हतें. आणि विशेष म्हणजे तेव्हांच्या त्या मुलानें बाईचें घाणेरडें चित्र काढलें होतें. ढब्बूनीं निरखून पाहिलें तेव्हां त्यांना आढळून आलें कीं या मुलानें फक्त एका होडीचें चित्र काढलें होतें.

ढब्बू मास्तरनीं त्याला आपल्या खास प्रेमळ स्वरांत विचारलें; काय बाळ, काय चाललें आहे ?'

घाबरून गेलेल्या त्या मुलाच्या तोंडांतून अर्थात् शब्दच फुटेना. ढब्बूंनीं त्याचा हात धरून त्याला आपल्या खोलींत नेलें. एव्हांना त्यांचें मन अगदीं उच्च पातळीवर गेलें होतें. म्हणजे त्यांनीं नेलें होतें. आपल्या समोर त्या मुलाला उभे करून त्यांनीं विचारलें, 'कां बाळ नांव काय तुझें ?'

'अशोक अनंत केळकर. इयत्ता तिसरी, अ—' एका धडाक्यांत मुलानें सगळी माहिती सांगून टाकली.

'पहिलीपासून ह्याच शाळेंत आहेस का तूं ?'

‘ नाहीं. गेल्या वर्षी माझ्या वडिलांची बदली झाली तेव्हां मी इकडे आलों. ’

एकाद्या लहान मुलानें पिकलेला आंबा दाबला म्हणजे जशी चिळकांडी उडते तसें ढब्बूंच्या तोंडांतून पटकन् हसूं फुटलें. आतां त्यांना उलगडा झाला होता. तो मुलगा त्यांच्या शाळेंतला नव्हता. तेव्हां त्याला शिस्त नसणें साहजिकच होतें. इतर शाळांचे दोष न दाखविण्याइतका शिष्टाचार सर सीताराम हायस्कूलमध्यें होता. परंतु तेथील सगळ्या माणसांना माहीत होतें कीं सर सीताराम हायस्कूलचा दर्जा गांठणें इतर शाळांना शक्यच नव्हतें. सर सीताराम हायस्कूलमधलीं मुलें तर इतर शाळांतल्या मुलांची सरळ सरळ टिंगल करीत असत.

डब्बू त्या मुलाकडे ह्या बुद्धीनें पाहूं लागले. ह्या चुकलेल्या वासराला आपण सन्मार्गावर आणायचें आहे अशी उच्च भूमका त्यांनीं घेतली. त्यांनीं विचारले, ‘ काय रे केळकर ? तूं चित्रें कशाला काढीत होतास ? ’

‘ भिंतीला चांगला पांढरा रंग आहे. त्याच्यावर चित्र चांगलें उठतें म्हणून काढत होतों. ’ तो मुलगा ढब्बूंच्या चेहेऱ्यावरील फरक पाहून धीट झाला.

‘ अरे पण चित्र कागदावर काढायचें असतें. ’ ढब्बू समजावणीच्या स्वरांत म्हणाले.

‘ पण कागदसुद्धां पांढराच असतो. ’ तो शिस्त नसलेला मुलगा म्हणाला.

आतां मात्र ढब्बूंना पुन्हा राग यायला लागला. तो आंवरत ते म्हणाले, ‘ अरे पण चित्र काढून भिंत वाईट होते. ’

‘ वाईट कशी होईल ? मी तर छान चित्र काढतों. दाखवूं तुम्हांला काढून ? ’ तो मुलगा आपण गुन्हा केला आहे ही कल्पना खोडून काढण्याच्या कल्पनेनें म्हणाला.

त्या लहान मुलाच्या ह्या तर्कशुद्ध बोलण्यामुळें ढब्बू अस्वस्थ होऊं लागले. कधीं कधीं लहान मुलें फार सरळपणें विचार करतात. आणि

त्याला कसें उत्तर द्यावें हें मोठ्या माणसांना समजत नाहीं. ढब्बूंना अर्थातच तें समजणें शक्यच नव्हतें. त्यामुळें ते कावले. इतर शाळांत मुलांना नीट शिस्त लावीत नाहींत ह्या गोष्टीची त्यांना चीड आली. अखेर त्या प्रसंगांतून स्वतःची सुटका करून घेण्याच्या इच्छेनें ते म्हणाले, ' बरें बरें, आता जा आपल्या वर्गात. पण पुन्हा भिंतीवर चित्रें काढूं नको, हं. '

पण त्या मुलाला ह्या प्रसंगांतून असें सुटणें योग्य वाटत नव्हतें. तो म्हणाला, ' पण सर, मी चांगलें चित्र काढत होतों. पाहिजे तर मीं आतां काढून दाखवतों. कागद द्या मला. '

त्या मुलाचें वागणें श्री. ढब्बूंना चमत्कारिक वाटलें. पण मुलांचीं मनें दुखवूं नयेत ह्या भूमिकेवर त्यांचा विश्वास असल्यामुळें त्यांनीं त्या मुलाला आपल्या टेबलावरचा एक कागद दिला. तो मुलगा म्हणाला, ' छे, छे, हा कागद नाहीं चालायचा. ड्रॉइंगचा कागद पाहिजे मला—आणि रंगाची पेटी पण. '

ढब्बूंच्या सहनशक्तीचा अंत अगदीं जवळ आला होता. पण सर सीताराम हायस्कूलच्या उज्वल परंरेकरितां त्यांनीं ती सामुग्री त्याला पुरवली. आणि एका कोपऱ्यांत बसून उत्साहानें तो मुलगा चित्र काढूं लागला.

इकडे ढब्बू पुनः आपल्या कामांत मग्न झाले. त्यानंतर त्यांनीं त्या नवख्या मास्तरना बोलावून घेतलें आणि ' Do you follow ? Do you follow ?' असें पुन्हा पुन्हा विचारून त्यांनीं ' Teach less, so that the students will learn more' हा आपला आवडता सिद्धांत त्यांना सुमारें तासभर समजावून सांगितला. नंतर त्यांनीं मॅजिकलँटर्न दाखविणाऱ्या एका माणसाशीं बोलणीं केलीं, इतर अनेक कामें उरकलीं, आणि बऱ्याच वेळानें त्यांनीं वर मान करून पाहिलें. तरी तो मुलगा अगदीं एकाग्रपणें आपलें चित्र काढीत होता. आश्चर्याचा त्यांना धक्काच बसला. त्यांच्या रागाचा पारा वर चढला. इतका वेळ मुलानें फुकट घालवला होता. वर्ग चुकविले होते. हतबुद्धपणें ते त्याच्याकडे पहात राहिले.

इतक्यांत त्या मुलानें आपलें चित्र पुरें केलें. पुन्हा पुन्हा त्याच्याकडे निरनिराळे कोन साधून पाहिलें. आणि मग उत्साहानें तें चित्र घेऊन तो ढब्बूंच्याकडे आला. तो जवळ जवळ ओरडला, ' सर ! सर ! पहा तरी किती वंडरफुल चित्र काढलें आहे मीं. हें आपल्या शाळेच्या भिंतीवर आपण लावूं या. म्हणजे तें पाहून सगळे लोक खूष होतील. आपल्या शाळेला चांगलें म्हणतील. '

ढब्बू मास्तर त्या वेड्या मुलाकडे बराच वेळ पहात राहिले. मग त्यांनीं त्याच्या चित्राकडे एकवार पाहिलें आणि ते म्हणाले, ' बरें ! बरें ठेव ते चित्र इथें. मी देईन तें ड्रॉईंग मास्तरांच्याकडे. तूं आतां वर्गांत जा बरें आपल्या. आणि हें पहा, पुन्हा पुन्हा असे वर्ग चुकवून तूं चित्र काढीत बसूं नको हं. चित्र काढायचें तें घरीं काढावें. शाळेंत अभ्यास करायचा असतो. '

तो मुलगा जागच्या जागीं थबकला. त्याच्या डोळ्यांतली लकाकी लोपली आणि नजरेंत शून्यपणा आला. त्याचा उत्साह मावळला आणि खांदे लुळे सोडून व मान खालीं घालून तो मुकाट्यानें बाहेर निघून गेला. त्याच्या मनांत जें कांहीं सुंदर होतें, जो कांहीं उत्साह होता, जो आत्मविश्वास उत्पन्न झाला होता त्याला जखम झाली होती. कदाचित् ती जखम भरून आली असती. कदाचित् नसतीहि. पण बहुतेक तिची व्रण त्यांच्या मनांत कायमची राहिली असती.

श्री. ढब्बूंनीं ह्या जखमेवर कांहीं इलाज केला नाहीं. पण हें थोडेसें क्षम्य आहे. कारण अशा जखमा टाळणें अगर त्यांवर इलाज करणें नेहमींच शक्य होत नाहीं. सगळ्याच माणसांना अशा जखमा सहन कराव्या लागतात. आणि जे कणखर अगर दैववान् असतात तेच त्या जखमा सोसून पुढें सरकतात. बाकीचे मनांत कुढत राहातात अगर त्यांच्या मनांतला कांहीं चांगला भाग मरून जातो. हें असें चालायचेंच. पण वाईट गोष्ट अशी कीं आपल्या हातून अशी जखम झाली तें ढब्बूंना मुळींच समजलें नाहीं. त्यांचें बी. टी. चें शिक्षण आणि सर सीताराम

ायस्कूलची उज्ज्वल परंपरा ह्यांची त्यांना ह्यावेळीं मदत होऊं शकली ाहीं.

आपल्या टेबलाशीं ते धिम्मेपणानें काम करीत राहिले. तेवढ्यांत. ाळेच्या दाराशीं एक मोटर थांबली आणि ऐटबाज पोशाख केलेला एक ीमंत गाडींतून उतरला. हेडमास्तराना त्याची चिठी जेव्हां शिपायानें ाणून दिली तेव्हां ते लगबगीनें पुढें झाले. मोठ्या आदरानें, नव्हे जवळ ावळ लाचारीनेंच त्यांनीं त्यांचें स्वागत केलें. कारण ते गृहस्थ एक मोठे यापारी होते. त्यांनीं खूप पैसा मिळविला होता. कीर्ति मिळविली होती. ानधर्म केला होता. आणि सर सीताराम हायस्कूलला आपली इमारत ाढविण्याकरितां एक लाख रुपये देण्याचें त्यांनीं कबूल केलें होतें. अशा ोठ्या व्यक्तींचें स्वागत लाचारीनें करायचें नाहीं तर कसें करायचें ?

हेडमास्तर आपल्या घवघवीत चेहेऱ्यावर लाचारीचें हास्य आणून ्हणाले, ' आपण कशाला येण्याची तसदी घेतलीत ? निरोप पाठवला ासतां तर मी स्वतः आलों असतों. '

' आपली शाळा पहाण्याची फार इच्छा झाली म्हणून आलों. ' । गृहस्थ भिंतीवरच्या सुभाषितांकडे पहात म्हणाले.

' म्हणजे ! आपण आमच्या शाळेचे माजी विद्यार्थी काय ? ' ़डमास्तरांना अगदीं कृतकृत्य झाल्यासारखें वाटलें. सर सीताराम ़ायस्कूलची उज्वल परंपरा अधिकच उज्वल केली असें त्यांना वाटूं लागलें.

पण ते कांहीं बोलणार इतक्यांत ते गृहस्थ म्हणाले, ' हें पहा हेड- ास्तर, तुम्ही मुलांच्या शीलसंवर्धनाकडे विशेष लक्ष पुरवतां कीं नाहीं ? '

' वा ! वा ! हें काय सांगायला हवें ! आम्हीं...' आणखी हेड- ास्तरनीं लांबलचक व्याख्यान द्यायला सुरवात केली.

पण त्या गृहस्थांनीं जवळजवळ अपमानकारकपणेंच त्यांचें तें ्याख्यान बंद पाडलें.

मग त्यांनीं विचारलें, ' ह्या सगळ्या सुभाषितांवर तुमचा विश्वास

आहे ना ? त्याप्रमाणें तुमचें आचरण असतें कीं नाहीं ? '

हा प्रश्न हेडमास्तरना विचित्र वाटला. म्हणून त्यांनीं आश्चर्यानें त्या गृहस्थाकडे पाहिलें आणि त्यांना असा संशय आला कीं तो गृहस्थ मिस्किलपणानें हंसत आहे.

ते परत कांहींतरी बोलणार होते. पण त्या गृहस्थांनीं त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें आणि ते शाळेच्या इमारतींत हिंडूं लागले. त्यांच्या मागोमाग हेड-मास्तर आपली प्रतिष्ठा सावरीत आणि लाचारी आवरीत चालूं लागले.

ते गृहस्थ आपण दिलेल्या पैशांतून इमारत कशी बांधावी, त्यांत मोठ्या माणसांचीं चित्रें कशी लावावीं व सुभाषितें कशी ठिकठिकाणीं टांगावीं तें सांगत होतें. स्वतःचा सर सीताराम यांच्या सारखाच एक पुतळा शाळेच्या दाराशीं असावा असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें. आणि ते हें सगळें मिस्किलपणानें सांगत आहेत असा ढब्बूंना अधिकच संशय येऊं लागला.

अखेर ते गृहस्थ फिरतांफिरतां एका भिंतीपाशीं थांबले. बराच वेळ त्यांनीं विचित्र नजरेनें तिकडे पाहिलें आणि मग एकदम हेडमास्तरांच्या खिशांतील पेन्सिल काढून घेऊन त्या भिंतीवर एका बाईचें घाणेरडे चित्र काढलें.

नंतर स्तंभित झालेल्या ढब्बू मास्तरांचा हात पकडून ते जवळजवळ दरडावून म्हणाले, ' पुष्कळ वर्षांपूर्वीं असेंच चित्र ह्याच भिंतीवर काढल्या-बद्दल मला इथल्या जुन्या हेडमास्तरांनीं शाळेंतून हांकून लावलें होतें. आणि सुभाषितांप्रमाणें वागण्याचा आणि शील संपादन करण्याचा मला उपदेश केला होता. मी त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागलों असतों तर इतका श्रीमंत व प्रसिद्ध कधींच झालों नसतों. आणि सुभाषितांनीं नटलेली अशी नवी इमारत बांधायला मला पैसाही देतां आला नसता '...आणि विचित्रपणें हंसत ते गृहस्थ एकदम निघून गेले.

• • •

# दोन न्याय : : ९

आतां मी परत माझ्या खुराड्यांत आलों आहे. चिंचोळ्या बोळकंडींतील अरुंद घरांत दाटीवाटीनें ठेवलेल्या आरामखुर्चींत मी पाय पसरून बसलों म्हणजे सुखोपभोगांची परमावधि होते. क्वचित् खिडकीचा पडदा दूर करून मी आकाशाच्या वेड्यावाकड्या चतकोर तुकड्याकडे पाहतों. पण तें पावसाळी कोट घ्यावा कीं न घ्यावा ह्या हिशेबी दृष्टीनेंच ! सर्वसाधारणपणें मी कागदपत्रांकडे नाहींतर अंगावर येणाऱ्या मोटारगाड्यांकडे पाहत असतों. आणि ते देखील काम नाहींतर अपघात चुकविण्याच्या दृष्टीनें ! क्वचित् करमणूक म्हणून पैसे देऊन मी सिनेमा–नटयांच्या चेहेऱ्यांकडे पाहतों वेळीं-अवेळीं मोठ्यानें सिनेमागीतांच्या तबकड्या लावणारा समोरचा हॉटेलवाला हा माझा सर्वांत मोठा शत्रू ! पण सरळ जाऊन पोलिसांत तक्रार नोंदवावी अशा विचारानें येरझारा घालण्यापलीकडे माझ्या शत्रुत्वाची मजल जात नाहीं. कधीं शब्दकोडें सोडवून मी दैवाच्या घोड्याच्या शेपटीला लटकण्याचा प्रयत्न करतों, पण त्याच्या टापांनीं उधळलेला धुरळा नाकातोंडांत जाण्यापलीकडे कांहीं घडत नाहीं. कधीं मी सिगरेटचा मोह निग्रहानें झिडकारतों, आणि कधीं सरळ टॅक्सी करून बायकोबरोबर फिरायला जातों–बेदरकारपणें !

इतकेंच !

हीच माझ्या जीवनाची लांबी, रुंदी आणि खोली !

कळत नाहीं असें कसें म्हणूं ? सारें कांहीं कळतें. पण मन कसें झिजून थकून गेलें आहे...जाऊं दे आतां हें असेंच चालायचें.

पण ही कर्मकथा सांगायची म्हणून नाहीं बसलों लिहायला. कधीं वाटलें नव्हतें असा प्रसंग येईल म्हणून! आम्हां गरीबांना पुण्याला जाऊन यायचें तरी दोन महिने विचार करावा लागतो. मध्यें एकदां भाचीच्या लग्नाला जायचें होतें. बायकोला घ्यायची होती बरोबर. तेव्हां कोण धांवपळ! मुलांच्या जेवणाखाण्याची व्यवस्था करावी लागली. घरांत राहायला माणूस बघावें लागलें. रजेकरितां दहा वेळां तोंड वेंगाडावें लागलें. बरोबर न्यायला चांगलीशी बॅग नव्हती म्हणून पुतण्याची मागून आणावी लागली. आणि मग एकदां हाललें आमचें बूड! बरें, इतकी यातायात करून गेलों, त्याची अपूर्वाई कांहीं त्या माणसांना वाटली नाहीं. इतकीं माणसें आलीं होतीं त्यांतच आम्ही. कोणी बाबासाहेब, काकासाहेब आले होते. त्यांचा लोभझोक संभाळण्यांतच सारीं माणसें दंग! असें वाटलें कीं उंबरठ्यावर डोकें आपटून कपाळमोक्ष करून घ्यावा. पण त्याला देखील धीर लागतो.

अरे! पण हें काय मी सांगत बसलों? तर गोष्ट निघाली प्रवासाला बाहेर पडण्यावरून. आमच्या आयुष्यांत हें क्वचितच घडतें. पण गेल्या वर्षीं आमच्या मनोहरच्या कृपेनें हा प्रसंग आला. त्यानें सरळ महाबळेश्वराहून तार केलीन कीं, आठ दिवस रहायला ये म्हणून. बाकी कांहींदेखील अडचणी नव्हत्या. मुलगी नुकतीच आजारांतून उठली होती. साऱ्यांच्या परीक्षा संपल्या होत्या. आणि कोंकणांतून आई चार दिवस राहायला आली होती. तिच्या हातीं घर दिलें आणि बायकोला घेऊन निघालों.

पण मनोहर कोण हें मीं तुम्हांला सांगितलेंच नाहीं कीं! मनोहर माझ्याबरोबरच कॉलेजांत होता. भारी हुषार! नुसता अभ्यासांत नव्हे, तर खेळांत आणि नाटकांत कामें करण्यांतदेखील. कॉलेजांतलें शिक्षण संपवून तो आय्. सी. एस्. झाला. नोकरीला लागल्यावरदेखील तो भारीच पुढें गेला. आणि आतां त्याच्या पगारांतल्या तीन पूज्यामागें किती आंकडा असेल कोण जाणे? त्याचें कांहीं आमच्यासारखें नाहीं. आज मुंबईला तर उद्यां विमानानें कलकत्त्याला! परवां दिल्ली! चार मोटारी

दाराशीं झुलताहेत. दिसतो देखील कसा गोरापान आणि राजबिंडा ! बाहुलीसारखी बायको आहे त्याची. कार्ट्या, कॉन्फरन्सेस, पार्ट्या ह्यांनीं त्याचें आयुष्य नुसतें गजबजलेलें आहे. त्याच्याकडे पाहिलें कीं वाटतें, फुकट आमचा जन्म ! परमेश्वरानें दिलेलें पंख ह्यानें पसरले आणि आकाशांत भरारी मारली. आम्ही मात्र जमिनीवरच खुरडत खुरडत चाललों आहोंत.

मनोहर इतका मोठा झाला असला तरी त्याला आढ्यता नाहीं. आपल्या जुन्या मित्रांना तो विसरलेला नाहीं. माझ्यावर पहिल्यापासून त्याचा अधिक लोभ. अधूनमधून तो मला भेटायला नाहींतर राहायला बोलावतो आणि मग कांहीं दिवस अगदीं चैनींत जातात

महाबळेश्वरला गेल्यावर असेंच झालें. तिथें आलेल्या श्रीमंतांचा थाट पाहून तर आमचे डोळे दिपून गेले. तिथली महागाईदेखील कांहीं कमी नव्हती. शेकड्यांनींच पैसा खर्च करायला हवा. तें सगळें पाहून आणि भोगून तृप्तता वाटली आणि गुदमरल्यागत पण झालें. पुन्हा–पुन्हा वाटलें कीं, व्यर्थ हा आमचा जन्म ! माणसानें जगावें तर असें जगावें. नाहींपेक्षा मेलेलें पत्करलें.

महाबळेश्वरला सृष्टीचें स्वरूप भव्य आणि भयचकित करणारें. मला विशेष चालण्याची आणि असली शोभा पाहण्याची हौस नाहीं. पण त्या हवेंत मन आणि शरीर कसें अगदीं हलकें होतें. उत्साह वाटतो, भूक लागते, जिभेला चव येते. असें एकंदरींत प्रसन्न वाटल्यामुळें मी वारंवार तिथें फिरायला जात असे. फिरणें बहुधा कुठच्या तरी कड्यावर संपत असे. आणि मग तिथून अक्राळविक्राळ दऱ्या आणि उन्मत्त पर्वत दिसायचे. तें दृश्य पाहून नजर फाटायची. वाटायचें कीं, डोक्यांत आग पेटली आहे. वाटायचें कीं, आपण पक्षासारखें उडावें आणि त्या दृश्यावर–तरंगत राहावें.

त्या कड्यांवर मी एकटाच तासन् तास बसून राहत असे. तिथें गळ्यांत थर्मास, दुर्बिणी आणि कॅमेरे लटकावलेलीं अनेक माणसें यायचीं. तीं एका कड्यावरून दुसऱ्या कड्याकडे बघायचीं आणि बोटें दाखवायचीं.

आणि मग दुसऱ्या कड्यावरून पहिल्या कड्याकडे पाहायचीं आणि बोटें दाखवायचीं, मग त्या भव्य पार्श्वभूमीवर स्वत:चे फोटो काढायचीं. आणि अखेर बरोबर आणलेलें सगळें खायचीं व कागदकचरा टाकून निघून जायचीं. त्यांची वटवट म्हणजे देखील त्या शांत, भव्य वातावरणांत, टाकलेल्या कचऱ्याकपऱ्यासारखी वाटायची.

कां कोण जाणे, पण कड्यावर येणारीं तीं माणसें मला आवडत नसत. तीं गेलीं म्हणजे मला बरें वाटायचें. आणि त्या दृश्यांत मी अधिकाधिक विरघळून जात असे. दऱ्यांत डोकावून पाहिलें कीं नुसती किर्र झाडीं दिसे. ठिकठिकाणीं डोंगरांच्या कुशींतून पाण्याचे ओहोळ स्वच्छंदपणें त्या दऱ्यांतून वाहत जात. मध्येंच मोकळ्या जागेंत शेतांचे चौकोन दिसत. आणि झाडींत दडलेल्या वस्तींतून धूर वर चढतांना दिसे. त्या उन्मत्त, ओबडधोबड डोंगरांच्या बाजूबाजूनें दरीच्या जबड्यांत उतरणारी पाऊलवाट दिसली म्हणजे कशानें तरी मन भरून येई. कधीं कधीं त्या पाऊलवाटेवरून एखादा मनुष्य जात असायचा आणि तो त्या दरींत दिसेनासा झाला तरी त्याची शीळ अगर त्याचें गाणें ऐकूं येत राहायचें. तें ऐकलें कीं पोटांत नुसती कालवाकालव व्हायची..

कां कोण जाणें, त्या दरींतील गर्द झाडी दूर असली तरीदेखील सजीव वाटायची. तिथल्या दर पानाच्या आणि दर झाडाच्या आड अनंत जीवसृष्टि वळवळत आहे आणि नेत्रांनीं वखवखलेल्या नजरेनें पाहत आहे असें सारखें वाटायचें. मध्येंच एखादें श्वापद कान टवकारून इकडून तिकडे जायचें आणि मग श्वास रोखला जायचा. त्या दरीवर मोठाले पक्षी विनाकारण तरंगत असायचे, निदान तसें वाटायचें तरी. पण कधीं-कधीं एकदम तीरासारखी ते झडप घालायचे. आणि मग एखाद्या चिमुकल्या पांखराचा अगर प्राण्याचा चिवचिवाट ऐकूं यायचा. आपल्या पायानें व चोंचीनें निर्दय प्रहार करून ते त्या प्राण्याला अगर पक्ष्याला अर्धमेला करायचे आणि मग त्याला आपल्या बळकट पायांत पकडून उंच झेप घेऊन कुठें निघून जायचे

ह्या दऱ्यांना वेढून ते प्रचंड, उन्मत्त डोंगर उभे होते. किती दूरवर नजर फेकली तरी आपले हे एकामागें एक मस्तकें उंचावून उभे आहेतच. कोणी झाडींत गुरफटलेले आणि कोणी उघडेवाघडे ! कोणी पुढें झुकलेले, तर कोणी मर्मभेद झाल्यामुळें कोलमडत आहेत असे दिसणारे ! कोणी अघळपघळ, कोणी सुळकेबाज ! मोठाल्या कड्यांनीं आपल्या पाठींनीं रेटून त्यांना उभे ठेविलें होतें. आणि तरी ते आपल्याच धुंदींत, आपल्याच नशेंत गुंगले होते. त्यांच्यावर क्वचित् जुनीं देवालयें, नाहींतर किल्ल्यांच्या तटबंदी यांचे उध्वस्त अवशेष दृष्टीला पडायचे. ते पाहून असें वाटायचें, काळाचें पुढचें पाऊल आतां आपल्या डोक्यावर पडणार आणि आपल्या ठिकऱ्या-ठिकऱ्या उडणार. पण असा प्रसंग आला तर भिऊन आणि चिडून काय होणार ? मान वांकवून आल्या प्रसंगाला सज्ज व्हायचें.

मोठाले पथ्थर तेथें झोंबी खेळायच्या तयारीनें उभे असत. पण त्यांच्या त्या रंगेलपणाकडे नुसतें दुर्लक्ष होत होतें. क्वचित् एखादा वानर उड्या मारीत तिथें त्या पथ्थरांवर यायचा. उभें राहून इकडे तिकडे पहायचा. आणि मग शेपटी उंचावून उड्या मारीत निघून जायचा. खो-खो हसूं यायचें तें दृश्य पाहून !

तिथल्या कड्यांच्या खाचाखोचांत मधाचीं मोठालीं पोळीं लागलेलीं असायचीं. आणि इवल्याशा मधमाशांचा गुणगुणाट तेथें सारखा चालूं असायचा.

दिवसाच्या बदलत्या प्रकाशांत तीं दृश्यें वेगवेगळीं दिसायचीं. भव्य आणि भयानक, उठावदार आणि उदासवाणीं, गूढ आणि फसवीं अशीं तीं दृश्यें दिसायचीं. कधीं दुपारच्या टकटकीत प्रकाशांत तीं दृश्यें स्पष्ट दिसायचीं आणि वितळायचीं, पण कधीं संध्याकाळच्या सांवल्या खूपसें लपवायच्या आणि खूपसें सुचवायच्या. रात्रीं चंद्रकोर आपल्या अंधुक प्रकाशांत कांहीं निराळेंच हुरहुर लावणारें टिपून काढायची. आणि कधीं दाट-धुक्यांत सारें कांहीं गुंतायचें आणि हरवायचें

तासन् तास त्या दृश्यांच्या धुंदींत मी उभा असे आणि भटकत

असे. माझी बायको म्हणायची कीं, मला वेड लागलें आहे. आणि मला-पण त्या माझ्या नादाची भीति वाटायची. असा वेडेपणा मीं कधीं केला नव्हता. कधीं-कधीं एखादी गाण्याची गोड लकेर ऐकूं आली म्हणजे टचकन् माझ्या डोळ्यांतून पाणी यायचें. पण मी तें पुसून टाकून हसत असे. असल्या गोष्टींचा मला कधीं नाद लागला नव्हता.

पण आतां मात्र मी स्वतःला विसरून गेलों. मला वाटायचें कीं, हीं सारीं दृश्यें खोल, गंभीर आवाजांत आपल्याला कांहींतरी सांगत आहेत. मी खूप कान देऊन ऐकण्याचा प्रयत्न करीत असे. पण अर्थबोध होत नसे. आवाज येत आहे ह्याची मात्र जास्त खात्री पटायची. असें वाटायचें कीं, जीवनाचा महामंत्र आपण येथें ऐकत आहोंत. पण त्या मंत्राची भाषा मात्र आपल्याला समजत नाहीं.

इकडे मनोहरच्या घरीं नुसती चैन चालली होती. रोज भरपूर, स्वादिष्ट खायचें, प्यायचें, खेळायचें, गप्पा मारायच्या, रेडियो ऐकायचा, असा क्रम चालला होता. पण त्यांत माझें मन नव्हतें. वाटायचें कीं कांहीं-तरी चुकते आहे, कांहींतरी खुपतें आहे.

एके दिवशीं मात्र सारें कुठें चुकलें आहे तें समजलें. सारें चांग-लेंच खुपलें. मनोहरच्या छोट्या मुलाचा वाढदिवस होता. त्यामुळें गोड-धोड केलें होतें. मुलाचें कोडकौतुक चालले होते आणि ओळखीच्या चार-चौघांना बोलावलें होतें. सगळ्यांनीं त्या मुलाला मोठमोठ्या किंमतवान वस्तू दिल्या, खेळणीं दिलीं. माझ्या बायकोनेंदेखील कांहीं लहानसें खेळणें विकत घेतलें होतें. उत्साहानें पुढें होऊन तिनें तें त्या मुलाच्या हातांत दिलें.

विजयनें त्याच्याकडे पाहिलें आणि मग तें दूर भिरकावून दिलें. तो म्हणाला, “ मला नको तें भिकारडें ! ” जमलेलीं सगळीं माणसें कावरींबावरीं झालीं आणि त्यांनीं आमच्याकडे पाहिलें. आम्हांला अगदीं चोरट्यासारखें झालें, पण तसें चेहेऱ्यावर दाखवायची चोरी होती. लगेच मनोहर पुढें झाला आणि त्यानें आपल्या मुलाला दटावलें. त्याची बायको पुढें झाली आणि तें खेळणें उचलून त्याची स्तुति करायला तिनें सुरुवात

केली. बाकीच्या माणसांनीं कांहीं झालेंच नाहीं असें दाखवून गप्पा मारायला सुरुवात केली. तीं सारीं माणसें फार चांगलेंपणानें वागलीं. आणि म्हणूनच मला जास्त गुदमरल्यासारखें झालें. त्या मोठ्या माणसांची मला विलक्षण चीड आली.

त्या रात्रीं मला झोंप आली नाहीं. आणि दुसऱ्या दिवशीं देखील मन असें कशांतच नव्हतें. मी उठलों आणि एका कड्याच्या टोकावर जाऊन बसलों. हिरव्या मखमलीवर लखलखीत खंजीर ठेवावा तशी तेथें दुपार दिसत होती. तिच्या धारेवरून बोट फिरवीत मी तेथेंच बसून राहिलों. इतक्यांत पंख मोठ्यानें फडफडले. आणि, कुठून कोण जाणे, एक प्रचंड पक्षी तडफडत, फडफडत माझ्याशेजारींच येऊन उतरला. तो धड आपल्या पायावर उतरलाच नाहीं. कोलमडून पडला आणि मग आपल्या पंखाच्या आधारानें कसाबसा उभा राहिला. त्याचे पंख जमिनीवर लोंबले होते आणि शेपूट गळल्यासारखें झालें होतें. त्याच्या मानेवरचीं पिसें गळून पडलीं होतीं. त्यामुळें तो विद्रूप दिसत होता. त्याच्या अंगावरची सगळीं पिसें उभीं राहिलीं होतीं. रोगटपणा त्याच्या सर्वांगावर लिहिलेला होता. तरीदेखील त्याचे पाय विलक्षण मजबूत दिसत होते. आणि त्याची बांकदार, कठीण चोंच एखाद्या लोहाराच्या हत्यारासारखी वाटत होती. ह्याच पायांनीं आणि चोंचीनें त्यानें अनेक प्राण्यांवर निर्दयपणें प्रहार केले असतील. पहिल्यानें मला त्यांची जरा भीतीच वाटली. आपल्या क्रूर, चकाकत्या नजरेनें जेव्हां त्यानें माझ्याकडे पाहिलें तेव्हां वाटलें कीं, उठून जरा दूरच जाऊन बसावें.

पण मी स्वतःलाच हसलों आणि एक दगड त्याच्या अंगावर भिरकावला. दगड त्याला चांगलाच लागला असावा. तो जरा दूर सरकला. त्याचे क्रूर डोळे तसेच भावनाशून्यपणें लकाकत होते. आपल्या चोंचीची त्यानें उघडमीट केली आणि मग तिनें उरलींसुरलीं पिसें साफसूफ केलीं. मग मान आकसून पंख लोंबते सोडून तो बसून राहिला. मला त्या पक्ष्याची दया आली. वाटलें कीं, त्याला खाऊं पिऊं घालावें, सांवलीच्या ठिकाणीं न्यावें.

इतक्यांत तसलेच पांच–सहा प्रचंड पक्षी झेंपा घेत तेथें आले. ते सारे त्या पक्षाभोवतीं घिरट्या घालूं लागले. त्यांच्या बळकट पायांचीं तीक्ष्ण नखें मला दिसूं लागलीं. त्यांच्या चोंचींचीं हत्यारें परजलेलीं होतीं. आणि त्यांचे क्रूर, चकचकीत डोळे त्या पक्षाकडे लागले होते. त्या पक्षानें एक क्षीण चीत्कार केला आणि तो धडपडत कशाच्यातरी आडोशाला जाण्याचा प्रयत्न करूं लागला.

मी भयभीत होऊन थोडा दूरच गेलों.

इतक्यांत चीत्कार करीत एका पक्षानें त्याच्यावर झडप घातली. आपल्या पायांनीं त्याच्या अंगावर प्रहार केला आणि चोंचीनें त्याचीं पिसें उपटून काढलीं. त्या पक्षानें देखील मान फिरवून पंख फडफडावून प्रतिकार केला. पण त्याचें अर्थात् कांहीं चालण्यासारखें नव्हतें.

तो पक्षी पंख हालवीत आणि चित्कार करीत दूर सरकत होता आणि प्रतिकाराला पण सज्ज झाला होता. ते पक्षी त्याच्याभोवतीं चीत्कार करीत घिरट्या घालीत होते. हळूहळू घिरट्यांचीं वर्तुळें लहान–लहान झालीं. आणि मग परत एका पक्षानें त्याच्याशीं लगट केली. पायांनीं प्रहार करून आणि पिसें उपटून तो पुढें सटकला. पुन्हां त्यानें चीत्कार केला. पण एकामागून एक ते पक्षी त्याच्यावर हल्ले करूं लागले. तो दूर सरकत होता, क्षीण चीत्कार करीत प्रतिकार करीत होता. पण त्याची प्रतिकाराची शक्ति कमी होत होती. एकदोनदां तो कोलमडून पडला देखील. तरी पुन्हा उठून तो प्रतिकार करीत होता.

पण ते दुसरे पक्षी एकामागून एक त्याच्यावर हल्ला करीत होते. निर्दयपणें प्रहार करीत होते, लचके तोडीत होते. तिथल्या तिथें ते घिरट्या घालूं लागले. अधिकच क्रूरपणानें झडपा घालूं लागले. तो पक्षी नुसता रक्तबंबाळ झाला. त्याचे पंख निर्जीवपणें पसरले. मांस लोंबूं लागलें. खुरडत–खुरडत तो सरकत होता. क्षीण चीत्कार करीत प्रतिकार करीत होता. अखेर तो कोलमडून पडला. आणि वळवळ, फडफड करीत त्याचें लोळामोळा झालेलें शरीर कड्याखालीं कोसळलें. कोसळतांना त्याचे क्रूर

निर्विकारपणें चकाकणारे डोळे तेवढे मला दिसले. त्याच्या शरीराच्या-मागोमाग तीरासारख्या झेपा घेऊन ते पक्षी खालीं गेले. आणि दिसेनासे झाले.

थोड्या वेळानें विजयी चीत्कार करीत ते झेपा घेत वर चढले आणि अंतराळांत दिसेनासे झाले; पण मला माहीत होतें ˜ कुठेंतरी ते सगळ्या भूभागाचें आपल्या क्रूर, निर्विकार नजरेनें करीत असावेत.

त्या प्रसंगानें माझा जीव थरारून गेला. पुष्कळ वेळ वाटत होतें कीं, ते पक्षी माझ्याच अंगावर प्रहार करीत आहेत. आणि मग, कां कोण जाणे, मला त्या आदल्या दिवशींच्या प्रसंगाची आठवण झाली. मनोहरची व इतर माणसांची चांगली वर्तणूक आठवली. आणि स्वतःचा आणि त्या माणसांचा विलक्षण राग आला. आपण जिवंत आहोंत याचीच शरम वाटली.

डोंगर खदखदां हसले. सावल्यांनीं त्या अक्राळविक्राळ दरीवर पांघरूण ओढलें. वृक्षांनीं अर्थपूर्ण मौन धारण केलें.

आतां मी परत माझ्या खुराड्यांत परतलों आहे. पण कड्यावरचा तो प्रसंग अजून मला ताज्या जखमेसारखा आठवतो आणि जाणवतो.



## भिराभिरें : : १०

अफाट, ओसाड भासणारा समुद्र क्षितिजाच्या कडेकडून ओसंडत होता. त्याला रेतीची नाजुक किनार जोडलेली होती. आणि मध्येंच, कोसळतां कोसळतां सांवरलेल्या किल्ल्याचा अजस्त्र मृत देह होता. त्या किल्ल्याच्या तटबंदीचे कांहीं दगड निखळून खालीं रेतींत पडले होते. आणि उरलेल्या तटबंदीच्या फटीफटींतून गवताचे पुंजके उगवलेले होते. तें वाळलेलें गवत एखाद्या म्हाताऱ्या माणसाच्या दाढीसारखें दिसत होतें. आणि वाऱ्यानें तें हललें कीं तो किल्ला मृत आहे हें एकदम भीतिदायकपणें जाणवत होतें. त्या तटबंदीच्या टोंकावर एक वठलेलें पांढरें झाड आपल्या निष्पर्ण फांद्या फिसकारून उभें होतें त्या निष्पर्ण गांठींनीं भरलेल्या फांद्या एखाद्या जाखिणीच्या बोटांसारख्या दिसत होत्या. कोण्या पोरानें एक चकाकत्या रंगाचें भिरभिरें त्या तटावर अडकवलें होतें. तें सारखें भिराभिरत होतें. एखाद्या लहान मुलानें खुदुखुदु हंसावें त्याप्रमाणें ! कोणी अर्धवट माणसानें स्वतःशीं बडबडावें त्याप्रमाणें !

संध्याकाळच्या तांबूस प्रकाशांत विषण्ण हास्य करीत ती कोसळणारी तटबंदी अफाट ओसाड भासणाऱ्या समुद्राकडे पाहत होती. दुष्ट माणसाच्या नजरेंतील निरागसतेसारखा समुद्राचा निळा नितळ रंग दिसत होता.

भरतीच्या लाटांचें पाणी फसवेपणानें मागें सरकून पुन्हा अधिकच पुढें सरकत होतें. किनाऱ्यावर कीटकांनीं सुंदर नक्षीदार घरें बांधलीं होतीं. भरती-ओहोटीच्या दरम्यान कीटकांचे एक सुंदर नगर तेथें वसलेलें होतें. त्यांतलें प्रत्येक घर इतक्या काळजीपूर्वक बांधलेलें होतें कीं, जणूं तेथें

पिढ्यान् पिढ्या नांदायच्या होत्या कीं जणुं यावत्काल तें टिकून रहायचें होतें. अगदीं सहज खेळकरपणानें लाटा तें नगर पुसून टाकूं लागल्या. दोन क्षण बुडबुडे येत होते आणि घर बुजून जात होतें. नक्षी विरघळत होती, फेस फसफसत होता.

आणि असंख्य प्राणी पाण्यापासून दूर वर चालले होते. आपल्या न मिटणाऱ्या आणि बाहेर लोंबणाऱ्या डोळ्यांनीं पहात आपल्या अनेक पायांनीं ते चालले होते. त्या असंख्य प्राण्यांच्या मनांत एकच कल्पना होती : ते सगळे सुरक्षिततेकडे चालले होते. त्या अल्पजीवी प्राण्यांना जगायचें होतें. त्या एकाच उत्कट प्रवृत्तीनें पछाडलेले ते इवलाले दुर्बल प्राणी त्या वेळेला फार भयंकर वाटत होते. त्यांना पछाडणारी ती प्रवृत्ति त्याहूनही अधिक भयंकर वाटली. त्यांचे अनुभव, त्यांचीं दुःखें, त्यांचे प्रयत्न, सारें त्या एका पछाडणाऱ्या प्रवृत्तींतून निर्माण झालें होतें. त्या प्रवृत्तींतूनच त्या प्राण्याची पुन्हा पुन्हा निर्मिति व्हायची होती. आणि त्या प्रवृत्तीशींच त्यांचा अंत निगडित होता. ते बाहेर लोंबणारे,न मिटणारे डोळे, ते इवलाले पाय, ते एकाच दिशेनें धांवणारे असंख्य प्राणी, तें पुढें पुढें सरकणारें पाणी !

हंसत-खिदळत एक तरुण आणि एक तरुणी त्या किनाऱ्यावर आली. आपल्या पायांचे ठसे वाळूंत उमटवीत तीं दोघें चालत होतीं. असंख्य बाहेर लोंबणारे डोळे त्यांच्याकडे पहात होते. असंख्य इवलाले पाय, दिशा बदलीत होते. त्यांच्या मार्गांतून दूर होत होते. त्यादोघांचें अर्थात् तिकडे लक्ष नव्हतें. त्यांचें कशाकडेच लक्ष नव्हतें. तो पडका किल्ला, तो ओसाड भासणारा समुद्र ह्याची त्यांना दखल नव्हती. कांहीं दिव्य आणि अमर आपल्याला सांपडलें आहे, फक्त आपल्यालाच सांपडलें आहे या उन्मादांत तीं होतीं. जर त्यांना कोणीं सांगितलें असतें कीं हें साऱ्यांनाच सांपडतें, कीं ह्यांत कांहीं दिव्य नाहीं, कीं जीवनमरणाच्या सांखळींतला हा एक दुवा आहे तर... तर त्याला काय उत्तर द्यायचें हें त्यांना माहीत होतें का ? त्याला खरोखर कांहीं उत्तर आहे का ?

तो तिच्या केसांच्या लाडिक वळणांकडे पाहात होता. तिच्या झंपराचा खालपर्यंत आलेला गळा जो दाखवीत होता आणि जें दिसावें अशी आतुरता निर्माण करीत होता त्याकडे तो पाहात होता. तिच्या नितंबाच्या हालचालींत डुचमळणाऱ्या सुखाकडे पहात होता. छे! तो केव्हांच एका अद्भुत विश्वांत गेला होता. त्या विश्वांत एक सारखी सिगारेट ओढणारा चलाख डिटेक्टिव्ह होता, जिथले हिरव्या पोशाखांतले वेटर पुन्हा पुन्हा सलाम करतात आणि ऐटबाज लाचारी दाखवतात, असें उंची हॉटेल होतें, घशांत कांहीं अडकलें आहे अशा स्वरांत केलेलीं तुटकीं इंग्रजी संभाषणें होतीं, टेबलावर नाण्यांचा ढिगारा ठेवून चाललेला पत्त्यांचा जुगार होता, एक डोळा मिचकावून फिदीफिदी हंसणारी, झिंगलेली गौरकाय स्त्री होती, पिस्तुलें होतीं, रक्ताच्या थारोळ्यांत पडलेलें एक प्रेत होतें. तें प्रेत पाहून त्याचें मस्तक फिरल्यासारखें आणि त्या तिरमिरींत तो तिला फरफटत कुठें तरी घेऊन गेला.

अर्थातच हें जग कांहीं अद्भुत नव्हतें. त्यानें पाहिलेल्या सनसनाटी चित्रपटांतून उसनवारी करून तें जग त्यानें तयार केलें होतें. त्याच्या कल्पनादारिद्र्याची आणि हलक्या अभिरुचीची तें साक्ष देत होतें. पण त्या क्षणीं तें अद्भुत आणि दिव्य होतें.

त्याची दाढी आपल्या गालाला टोंचते आहे असें तिला वाटत होतें. आणि त्या कल्पनेनें तिचे गालच नव्हे तर तिचें सारें शरीर हुळहुळत होतें. आणि ती देखील आपल्या अद्भुत सृष्टींत गेली होती. त्या सृष्टींत दोन छान केसाळ कुत्रीं होतीं आणि दोन बाळसेदार मुलें! वाटोळ्या टेबलावर भरतकाम केलेलें टेबलक्लॉथ घातलेलें होतें. आणि त्यावर चांदीचें नक्षीकाम केलेलें पुष्पपात्र होतें. एका कोपऱ्यांत त्या दोघांचा फोटो होता. त्याच्याकडे तिची मैत्रिण नवऱ्यासह बसायला आली होती. आणि चहा पीत पीत त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. ती कांहीं तरी गमतीदार हकीकत सांगत होती, 'किनई ' ...तिची मैत्रिण हंसून म्हणत होती, 'अय्या! खरं का?' आणि-आणि झोंपायच्या खोलींत तिचा

नग्न फोटो...इश्श ! आम्ही नाहीं जा ! ती त्याच्याकडे बघून हंसली. तो तिच्याकडे बघून हंसला.

त्यांनीं एकमेकांचे हात हातांत घेतले आणि उगीचच त्यांना हेलकावे दिले. मग ती धांवत जाऊन समुद्राच्या पाण्यांत उभी राहिली. तोही तिच्या मागोमाग धांवत गेला. पाण्याचा थंड स्पर्श ! रेतीचा स्पर्श ! हंसत हंसत तिनें डोळे मिटून घेतले. खरें म्हटलें म्हणजे भीतीच वाटली तिला डोळे मिटतांना. लाटांबरोबर माणसें वाहून गेल्याचें तिनें ऐकलें होतें. पण तरी तिनें डोळे मिटून घेतले. लाट ओसरली. पायाखालची वाळू भुळभुळत सरकली. आधार ! आधार ! तिच्या शरिरांतल्या प्रत्येक कणानें हेंच आक्रंदन केलें. ही एकच इच्छा तिचें मन व्यापून राहिली. आपल्या मुठी घट्ट आवळून ती किंचाळली.

त्यानें झटकन् तिच्या अंगाभोंवतीं हात घातला. त्याच्या दंडाचे कठीण स्नायु तिच्या मऊ शरिरांत रुतले. आपला सारा भार तिनें त्याच्या अंगावर टाकला. आणि मग ती म्हणाली, "मीं घाबरलें नव्हतें कांहीं. मुळींच घाबरलें नव्हतें. मीं उगीचच आपली गंमत केली. खोटें होतें तें सगळें."

हो ! तें सगळें खोटें होतें. आणि टेबलक्लॉथवरची नक्षी खरी होती.

त्याला वाटलें कीं जगांतल्या साऱ्या संकटांपासून तिचें संरक्षण करावें. एखाद्या मौल्यवान् हिरकणीप्रमाणें तिला जपावें, त्याकरितां प्रसंग पडला तर आपलें रक्त सांडावें, आणि त्याला आपल्या उदात्तपणाचें कौतुक वाटलें, अभिमान वाटला. त्यागाच्या उत्तुंग कल्पना त्याच्या मनांत येऊन गेल्या. तिचें मऊ शरीर त्यानें अधिकच जवळ ओढलें.

त्या दोघांना वाटत होतें; जग किती किती कठोर आणि दुष्ट आहे. आपण किती किती चांगलीं आणि मृदु मनाचीं आहोंत. त्यांचें मार्दव आणि चांगुलपणा हीं त्या कठोर जग राहाटीचाच एक भाग आहे हें त्यांना

समजूं शकत नव्हतें. किंवा त्यांना तें न समजावें हा देखील त्या कठोर जगराहाटीचाच एक भाग होता.

त्या मनःस्थितीचा बहर ओसरला आणि तीं दोघें हंसत, खिदळत, धांवत तो किल्ला चढून गेलीं. ज्या ईर्षेनें शिकंदरानें जग पादाक्रांत केलें त्याच ईर्षेनें तीं दोघें त्या किल्यावर चढून गेलीं. गवत तुडवीत, दगडावर ठेंचाळत, दरडीवर चढत तीं दोघं वर पोहोंचलीं. तीं धापा टाकीत होतीं. त्यांचीं शरीरें घामानें ओलसर झालीं होतीं. शरीरभर धांवणाऱ्या रक्त-प्रवाहानें त्यांचे चेहेरे लालसर झाले होते. त्यांच्या वृत्ति उत्तेजित झाल्या होत्या, चेतल्या होत्या. ह्याच ईर्षेनें त्यांना एक नवें जग निर्माण करायचें होतें. त्याकरितां तीं असेच परिश्रम करणार होतीं. आणि इतक्यांच सह-जतेनें तें नवें जग निर्माण होणार होतें.

कसल्या तरी कैफाच्या नशेंत, कमरेवर हात ठेवून, डोळे विस्फारून तीं त्या अफाट ओसाड वाटणाऱ्या समुद्राकडे पहात होतीं. वितळणाऱ्या क्षितिजाशीं जाऊन ठेपलेल्या शिडाच्या शुभ्र त्रिकोणाकडे पहात होतीं. तिनें एक दीर्घ श्वास घेतला आणि आजूबाजूला पाहिलें तें भिरभिरें तिला दिसलें. तिनें तें उचललें आणि आपला हात उंच केला. जणुं ती एक विजयध्वजा होती.

तो प्रफुल्लपणें हंसला. ती देखील हंसली आणि तें भिरभिरें तसेंच भिरभिरत राहिलें. लहान मुलानें खुदुखुदु हंसावें त्याप्रमाणें! कोणी अर्धवट माणसानें स्वतःशीं बडबडावें त्याप्रमाणें!

खालीं फसवेपणानें मागें जात पाणी पुढें पुढें सरकत होतें आणि एकाच भयंकर इच्छेनें प्रेरित झालेले ते प्राणी पाण्यापासून दूर दूर चालले होते.

तारुण्यसुलभ बेपर्वाईनें आणि उर्मटपणानें त्यांनीं त्या किल्ल्यांतील अवशेषांकडे पाहिलें. तेथें गोठलेल्या भूतकालाचें बर्फ तोंडांत टाकून मिटक्या मारल्या. तेथें रेंगाळणाऱ्या इतिहासाच्या मिशा ओढल्या. गंमत

केली. त्यानें तिला एका दगडाच्या आसनावर बसवलें आणि मोठ्या अदबीनें कुर्निसात केला. तिनें किंचित् मान हालवून त्याचा स्वीकार केला. आणि मग बेफिकीरपणें त्याला बोलण्याचा हुकूम केला.

तो अदबीनें म्हणाला, "शहाजादी, या बंद्याचा एक मामुली अर्ज आहे."

ती म्हणाली, "काय आहे? बोल, बेशक बोल."

"या बंद्याला शहाजादीच्या गुलाबी गालांचें चुंबन हवें आहे."

शहाजादी एकदम संतापली. तिनें जवळ उभ्या असलेल्या दोन ह्युडुपांना हुकूम केला, "जा! या बेवकुब आदमीचा कडेलोट करा."

बेवकुब माणूस खदखदा हंसला. त्यानें अगदीं बेवकुब हास्य केलें आणि मग शहाजादीला त्यानें सांगितलें, "येथें कडेलोट नसे होत, येथें गोणत्यांत शिवून समुद्रांत बुडवून मारीत असत."

तिनें अंग शहारल्यासारखें केलें. भीतीची खमंग फोडणी तिच्या उत्तेजित मनोवृत्तींना मिळाली. किती भयंकर! किती छान!

तिचें अंग तसें शहारलेलें पाहून तो खदखदां हंसला, अगदीं चेकाळून हंसला, आणि थोड्या वेळानें कुठून तरी प्रतिध्वनि आला. गंभीर! वेडावणारा! तो प्रतिध्वनि ऐकून तीं दोघें दच कलीं. स्तब्ध झालीं. तो प्रतिध्वनि आहे हें त्यांना समजलें, पण पटलें नाहीं. त्या वेडावणाऱ्या आवाजाची त्यांना भीति वाटली. ती परत एका दगडी आसनावर बसली होती ती चटकन् उठून उभी राहिली. आपल्या आणि तिच्या मनांतली भीति उडवून लावण्याकरितां तो म्हणाला, "माझ्या लहानपणीं एक मित्र होता. त्यानें एकदां ठरवलें होतें कीं पुन्हा पुन्हा ओरडून त्या वेडावणाऱ्या आवाजाला दमवायचें."

त्या आवाजाला दमवायचें! त्या विचित्र कल्पनेनें तिची भीति कमी झाली नाहीं, उलट ती वाढली. ती म्हणाली, "मग काय झालें!"

" तो खूप ओरड ओरड ओरडला पण, दर वेळेला त्याला उलट उत्तर मिळायचें. अखेर त्यानें खूप मोठी आरोळी ठोकली आणि मग कानावर हात ठेवून तो इथून पळत सुटला. " खांदे उडवून तो हंसला.

ती देखलि हंसली. पण तें नुसतें हास्याचें टरफल होतें.

तो म्हणाला, " चल मी तुला भुयार दाखवतों " आणि तीं दोघें भुयार पहायला गेलीं. खोल वेडेंवाकडें असें तें भुयार होतें. अंधार त्यांत लपून बसला होता आणि माणसासारखीं तोंडें असलेलीं वाघुळें आंत फडफडत हातीं. सारा तोल मागल्या बाजूला टाकून ती आंत वांकली. आणि मग तिनें गपकन् डोळे मिटून घेतले.

तो हंसून म्हणाला, " त्या भुयारांत एक माणूस उतरला होता. पण तो कधीं परत आलाच नाहीं म्हणतात."

ह्या वेळीं मात्र तिचें अंग खरोखरच शहारलें. तेवढ्यांत त्याच्या पायाखालची जमीन भसकन खालीं कोसळली आणि तो आंत घसरला. त्याच्या शरिरांतल्या प्रत्येक कणानें आक्रंदन केलें.—" आधार ! आधार ! मला जगायचें आहे." त्याला अंधार नको होता. त्या माणसासारखीं तोंडें असलेल्या वटवाघळांचीं त्याला फार फार भीति वाटत होती. तिनें त्याला घट्ट धरलें. त्यानेंही स्वःतला सांवरलें आणि तो बाहेर आला. तरीही तिनें मात्र त्याला घट्ट धरून ठेवलें होतें.

आपलें अंग त्यानें झटकलें आणि तो हंसला, पण तें हास्याचें नुसतें टरफलच होतें. अजून त्याचें अंग थरथरत होतें आणि त्या क्षणाला एक नवी भीति त्याच्या मनांत रुजली होती. कालप्रवाहाचें शोषण करून ती भीति फोंफावणार होती. त्याच्या व्यक्तिमत्त्वांत तिचीं पाळेंमुळें खोलवर जाणार होतीं आणि त्यामुळें त्या व्यक्तिमत्त्वाला भेगा पडणार होत्या. जन्मल्यापासून आजपर्यंत तो स्वतःला अमर समजत आला होता. मृत्यु अटळ आहे हें त्याला समजलें होतें पण उमजलें नव्हतें. थोड्याच वेळां-पूर्वीं जीवनांतलें जें अमर आणि दिव्य तें प्रीतीच्या रूपानें आपल्याला गवसलें असें त्याला वाटत होतें. आणि आतां...

आतां विराट् अशा भूतकालाचें त्याला दर्शन झालें होतें. क्षणाक्षणाला वाढणाऱ्या, वर्तमानाला ग्रासणाऱ्या आणि भविष्याकडे अधाशीपणानें जबडा वासून पहाणाऱ्या त्या अक्राळविक्राळ राक्षसाचं त्याला दर्शन झालें. तें भुयार त्याला भूतकालाच्या जबड्यासारखें वाटलें. त्याचें सारें कल्पनादारिद्र्य आणि त्याच्या मनाचा सारा कोतेपणा भेदून हें सत्य त्याच्या हृदयांत रुतलें.

आपला हात घट्ट धरून राहणाऱ्या तिच्याकडे त्यानें पाहिलें. आणि जितकें तिनें त्याला घट्ट धरलें होतें. तितक्याच प्रमाणांत तिचा आणि स्वतःचाहि दुर्बळपणा त्याला जाणवला. जितकी ती त्या क्षणीं त्याच्या जवळ होती, तितक्याच प्रमाणांत त्याला स्वतःचा एकाकीपणा खुपला. आपल्याला सांपडलेली प्रीति अमर आणि दिव्य आहे ह्याविषयीं त्याला शंका वाटूं लागली, कल्पनेनें त्यानें जें रेशमी जग स्वतःभोंवतीं निर्माण केलें त्याचीं एका तीक्ष्ण शस्त्रानें लक्तरें झालीं होतीं. तो खिन्न झाला.

शंकाकुल हृदयानें त्यानें विचारलें," तूं माझी ना ? "

" होय रे राजा."

" अगदीं माझी एकट्याची ? "

" होय, होय. अगदीं तुझी एकट्याची. "

त्यानें एक दगड खालीं भिरकावला आणि तो स्तब्ध राहिला. तिनें एक अणकुचीदार दगड घेतला आणि ती त्याचें नांव तिथल्या एका भिंतीवर कोरूं लागली.

तो तिच्या चाळ्यांकडे पाहून म्हणाला, " ह्या दालनांत पूर्वी एका किल्लेदाराची फार सुंदर बायको रहात असे."

" असं ? "

" त्याचें तिच्यावर अत्यंत प्रेम होतें. एकदां त्याला समजलें कीं तिचें दुसऱ्या एका माणसावर प्रेम होतें. तें कळतांच तो संतापानें नुसता

वेडा झाला. त्यानें त्या माणसाला पकडलें. त्याला अनेक दिवस उपाशी ठेवलें आणि त्याच्यासमोर तिला जबरदस्तीनें पंचपक्वानें खायला लावलें. तिच्यादेखत त्याला विद्रूप केलें. आणि अखेर त्याला तरवारीनें टोचून टोचून ठार मारलें."

" शी ! किती क्रूर ! " ती नांव कोरायची थांबली.

तो म्हणाला, " त्याचें तिच्यावर प्रेम होतें."

आणि मग त्याच्या मस्तकांत कसला तरी डोंब उसळला. सारासार विचार सगळा संपला. साऱ्या सुंदर आणि नाजुक कल्पना कोळपल्या. बसक्या आवाजांत तो म्हणाला, " तुमच्या शेजारीं तो वसंत रहात होता माहीत आहे; त्याचें...त्याचें तुझ्यावर प्रेम होतें ? "

तिनें दचकून त्याच्याकडे पाहिलें.

"बोल ! खरें बोल ! तुमच्याविषयीं मीं कुणकुण ऐकली आहे. त्याच्याबरोबर तूं फिरायला जायचीस कीं नाहीं ? ह्या-ह्या तुझ्या ओठांचें त्यानें चुंबन घेतलें कीं नाहीं ? " त्यानें तिचा दंड पकडला आणि तिला गदगदा हलवली.

त्याच्या डोळ्यांत इतकी क्रूरता तिनें पाहिली नव्हती. तो इतका फरक तिला वाटला नव्हता. ती भीतीनें किंचाळली. त्यानें तिचा दंड सोडला. स्वतःच्या मनावर पुन्हा ताबा मिळवला. विमनस्कपणें तो अफाट अन् ओसाड भासणाऱ्या समुद्राकडे पहात राहिला. एक तांबडी विचित्र लकाकी त्यावर पसरली होती. क्षितिजावरचा तो पांढराशुभ्र शिडाचा त्रिकोण अदृश्य झाला होता. आणि किनाऱ्याजवळ एक तोकडें ओंडकें पाण्यांत डुबक्या खात होतें. लाटांच्या थपडा खात कुठें तरी, कसें तरी वहात चाललें होतें.

ती त्याच्याजवळ येऊन म्हणाली, " नको रे माझ्यावर रागवूं. "

ती त्याला चिटकून उभी राहिली. दोघें तटाखालीं पुढें येणाऱ्या भरतीच्या पाण्याकडे पाहू लागलीं. फसवेपणानें ओसरत लाटांचें पाणी पुढें सरकत होतें. तटाच्या एका कोसळलेल्या दगडाभोंवतीं त्यानें विळखा घातला होता आणि तो दगड हळूहळू बुडत होता. त्या दगडावर एक छोटा समुद्रकांठचा प्राणी अडकला होता. आपल्या अनेक पायांनीं तो हळूहळू दगडाच्या कडेपर्यंत जाई आणि डुचमळून तें पाणी पाहून मागें सरके. पुन्हां दुसऱ्या बाजूनें तोच प्रयत्न सुरूं व्हायचा. त्या प्राण्याचा सारखा तोच प्रयत्न चालला होता. जगण्याच्या एकाच भयंकर इच्छेनें प्रेरित होऊन तो आपल्या साऱ्या हालचाली करीत होता. हळूहळू तो दगड पाण्याखालीं बुडत होता आणि त्या प्राण्याची फिरण्याची जागा कमी कमी होत होती. तरी पण त्या प्राण्याचा प्रयत्न थांबला नाहीं.

त्या दोघांची एकमेकांच्या हातांवरची पकड घट्ट झाली. विलक्षण तन्मयतेनें तीं दोघें त्या प्राण्याच्या प्रयत्नाकडे पहात राहिलीं. जणुं आपलाच जीवनमरणाचा प्रश्न सोडवला जात आहे असें त्यांना वाटलें. त्यांना वाटलें कीं कांहीं तरी चमत्कार होईल आणि हा प्राणी निसटेल इतक्या निर्दयपणें ह्या प्राण्याचा शेवट व्हावयाचा नाहीं. पण शेवटीं एक लाट आली आणि अगदीं सहजपणें त्या दगडाच्या माथ्यावरून गेली. ती भयंकर धडपड संपली.

त्यानें डोळे मिटून घेतले. ती अस्फुट किंचाळली आणि मागें सरकली. ती ओरडली, "चल! चल! जाऊं या आपण येथून! उशीर झाला. लवकर चल."

आणि तीं दोघें झपझप पावलें टाकीत निघालीं. ओसाड भासणारा तो समुद्र, जाखिणीच्या बोटासारख्या फांद्या असलेलें तें झाड आणि तें अर्धवटपणें स्वतःशींच बडबडणारें भिरभिरें ह्या सर्वांना मागें टाकून झपझप पावलें टाकीत तीं स्तब्धपणें चालत होतीं. त्यांना प्रकाशाकडे, लोकवस्ती-कडे, घराकडे जायचें होतें.

सकाळचे साडेसात वाजले आहेत. उंच डेरेदार झाडांच्या आड विसावलेल्या इंजिनिअर पटवर्धनांच्या बंगल्यावरदेखील उन्हें खेळूं लागलीं आहेत. त्यामुळें तांबूस कौलांचें तें निळसर घर अधिकच गोंडस दिसत आहे. खिडक्या-दारांचे उंची पडदे किलकिले केले आहेत. आणि त्यांतून उन्हाचे कवडसे आंत उतरले आहेत. आरसे, पुष्पपात्रें व विजेच्या पंख्यांच्यीं पातीं ऐटींत चमकत आहेत आणि फर्निचरचें पॉलिश व कपड्यांच्या रंगछटा उन्हाच्या स्पर्शानें उमलत आहेत, अधिक गडद होत आहेत. फुलांचा, अत्तराचा, साबणाचा व धुराचा मंद सुगंध घरांत विरलपणें पसरला आहे. आणि रेडिओंतून भावनांना छेडणारे संपन्न स्वर झरत आहेत.

बाहेर लाल मुंडासें बांधलेला माळी पिवळीं शेंदरी फुलें खुडत आहे. ऊन त्याच्या कातडींत आणि फुलांचें प्रेम त्याच्या रक्तांत मुरलें आहे. नुकतेंच कापल्यामुळें हिरवें गवत सतेज पोपटी रंगाचें दिसूं लागलें आहे. त्या उंच डेरेदार झाडावरून उतरून एक खार धिटाईनें कसलेंसें लाल फळ आपल्या पुढच्या दोन पायांत पकडून खात आहे. तिची ती धिटाई आणि ती भीति. दाराशीं बांधलेला केसाळ मोत्या कान टवकारून तिच्याकडे बघतो. त्याच्या नाकपुड्या आकुंचन पावतात, आणि हिसका मारून तो खारीच्या दिशेनें उडी घेतो. कांहींसा रागानें आणि कांहींसा आर्जवानें भुंकतो. खार घाबरते आणि पळून जाते. हावरा

कावळा कुंपणाच्या खांबावर बसून उगीचच ओरडतो. आणि माळ्याचा मुलगा ‘ ह्य ’ करून धांवत जातो व त्याला उडवून लावतो.

झाडाचें पान गळतें आणि माळी तें उचलून टाकतो.

साडेसात वाजले तरी शोभना अजून झोपलेलीच आहे. तिच्या मस्तकाखालीं मऊ उशी दबली आहे. बिछान्यावरची पांढरी शुभ्र चादर जरा सुरकुतली आहे. तिचा चेहेरा फुललेल्या ताज्या फुलाप्रमाणें टवटवीत दिसत आहे. त्याला काळ्याभोर कुरळ्या केसांचें कोंदण आहे. तिच्या भुंवया रेखलेल्या आहेत. तिच्या पापण्यांचे लांब काळे केस नाजुकपणें गालावर टेकले आहेत. तिच्या गालावर बिछान्यावरची एक सुरकुती अस्पष्टपणें उमटली आहे तिच्या जिवणीची रेषा अगदीं छोटीशी, नाजुक आहे. आणि यौवनाच्या टपोरल्या कळ्या श्वासाबरोबर मंदपणें वरखालीं होत आहेत.

आजी येते आणि शोभनेच्या केसांतून प्रेमानें हात फिरवून म्हणते, “ शोभना, शोभा, उठायचें नाहीं कां ? ”

तेवढ्यांत दादा येतो आणि उशी शोभनेच्या अंगावर मारतो. आजी त्याच्या अंगावर हात उगारते आणि म्हणते, “ नको रे. ”

मग शोभना उठते आणि आजीला बिलगून पुन्हां डुलकी घेते. आजी आपला सुरकुतलेला हात शोभनेच्या गालावर उमटलेल्या रेषेवरून फिरवते.

चहा पिऊन होईपर्यंत शोभनेचे डोळे नीटसे कधीं उघडतच नाहींत. आजीच बहुधा कप तिच्या तोंडाला लावते. आणि कधीं चहा पिण्यापूर्वीं शोभना आजीच्या मांडीवर लोळण घेते. चहा पिऊन झाला म्हणजे मात्र शोभनेला तरतरी येते. ती उठते आणि डुलत डुलत बाहेर जाते. पोपटाच्या पिंजऱ्याजवळ जाऊन ती त्याला डिंवचते आणि ‘ शोभाराणी ’ अशी हांक मारायला शिकवते. त्यानें ऐकलें नाहीं तर ती त्याला वेडावते, आणि

पिंजऱ्याला एक मोठा हेलकावा देऊन निघून जाते. पोपट पिंजऱ्यांत फडफडत राहतो.

मग ती वडील वाचत असलेल्या वर्तमानपत्रांत हळूच डोकें खुपसते. राजकीय बातम्या व अग्रलेख वाचायला तिला कंटाळा येतो. विनोदी चित्रें अगर चुटके तिला आवडतात.

बहुतेक वेळीं ती चुटक्याचा नाहींतर चित्रांचा अर्थ वडिलांना विचारते. विनोद आवडला तर ती खूप मोठ्यानें हंसते. नाहीं आवडला तर ती मान वेळावून आणि हातवारे करून म्हणते, "इश्श ! हाच का तो फुसका विनोद ?" हें सारें इतक्या डौलांत होतें कीं वडिलांना तिचें कौतुक वाटतें, व ते तिचा गालगुच्चा घेतात. ते पान उलटायला लागले कीं ती म्हणते, "थांबा ना, मला आत्महत्त्येची बातमी वाचायची आहे." मग वडील वर्तमानपत्रच तिच्या हातांत देतात आणि निघून जातात. शोभनाचें वाचन आपल्याच तालांत चालू रहातें. एखादी रोमांचकारी बातमी आढळली म्हणजे मग ती आजीला मोठ्यानें हांक मारते. आजी बिचारी काम सोडून बाहेर येते. शोभना तिला बातमी वाचून दाखवते आणि आपली टीका सुरू करते.

आजी झणकाऱ्यानें म्हणते, "हेंच का काम होतें ?"

मग शोभना जास्तच आवेशानें आजीला त्या बातमीचें महत्त्व पटवून देते. आजी झटक्यानें घरांत निघून जाते. तेवढ्यांत मोत्या कुत्रा उड्या मारीत येतो. आणि वर्तमानपत्र तुडवून शोभनेच्या अंगावर चढतो. वर्तमानपत्र तिथेंच रहातें आणि मोत्याशीं दंगामस्ती सुरू होते. ती मोत्याशीं लाडेंलाडें बोलते, त्याला दटावते, त्याच्याशीं भांडते. कधीं कधीं मोत्याचें नख तिला लागतें. रडूं येऊं नये म्हणून ती खालचा ओठ दातांनीं घट्ट दाबून ठेवते, पण तरी डोळ्यांतून पाणी येतेंच; आणि मान फिरवून ती रडावयाला लागते. ती थोडा वेळ रडते आणि मग उठून बागेंत जाऊन उभी रहाते. मग दाटून आलेलें रडणें ओसरतें. पण मोत्याला ती कधींच मारत नाहीं. फक्त त्याच्याशीं अबोला धरते.

कधीं कधीं शोभना रडते आहे हें घरांतल्या माणसांना समजतें. मग घरांत एकच कोलाहल होतो.

बाबा त्रासिकपणें म्हणतात, "द्या बरं त्या कुत्र्याला पांजरपोळांत पाठवून." आणि आरामखुर्चीतून उठून खिडकीपर्यंत एक फेरी घालतात दादा काठी घेऊन मोत्याच्या मागें लागतो. त्याच्या पाठींत चांगली एक छमकावतो आणि मग त्याला एक बिस्कीट घालतो. इतर वेळीं विशेष प्रेमळपणा न दाखविणारी आई धांवत बाहेर येते. शोभनेच्या अंगावरचा ओरखडा पहाते आणि औषध लावते मग ती मोत्याला जेवायला न घालायचा निश्चय जाहीर करते. आजी शोभनेला घेऊन घरांत जाते आणि तिला खाऊ द्यायला लागते. शोभना म्हणते, 'नको.' आणि बाहेर येऊन अभ्यासाला बसते.

अभ्यास करायचा म्हणजे शोभनाला सगळीं पुस्तकें पसरून बसावें लागतें. तिच्या पुस्तकांवर छानपैकीं वेष्टनें घालून त्यांच्यावर कलाकुसर केलेली असते. पुस्तकें कोरीं रहावीं म्हणून तिचा फार कटाक्ष असतो. त्याकरितां ती पुस्तकें फारशीं वाचत देखील नाहीं. सगळीं पुस्तकें नीटपणें पसरून झाल्यावर कांहीं वेळ त्यांच्याकडे ती कौतुकानें पहाते. कधीं कधीं वर्गांतल्या कमिटलीनें आपली पेन्सिल कुरतडली आहे असें तिच्या ध्यानांत येतें. मग ती चुकचुकते. आपल्या पेन्सिलीला गोंजारते आणि परत तिला नीट टोकें करून ठेवते.

पेन्सिलीचें टोंक हनुवटीला टोचून ती बाईनीं अभ्यास काय करायला सांगितला आहे त्याची आठवण करते. तिची स्मरणशक्ति चांगलीच तल्लख आहे. त्यामुळें तिला बाईनीं दिलेला अभ्यास ताबडतोब आठवतो. पण तिची बुद्धी त्याहूनहि तल्लख आहे. त्यामुळें त्यांतला बराचसा अभ्यास करण्याची आवश्यकता नाहीं अशी ती स्वतःची खात्री करून घेते. मग उरलेला अभ्यास तरी करायला हवा का अशी तिला शंका येऊं लागते. हळूहळू ती शंका बळावते. आणि अखेर तिला अशी धास्ती वाटूं लागते कीं कदाचित् चुकून आपल्या हातून जास्त अभ्यास होईल. परिस्थिति

इतकी गंभीर झाल्यावर पलीकडच्या निमाकडे जासूद पाठवणें अवश्य ठरतें. शोभनेचीं बहुतेक कामें हस्तकाकरवीं होतात. बसल्या जागेवरून एखाद्या पुस्तकाला तिचा हात पोहोंचत नसला तर ती आजीला हांक मारते आणि पुस्तक द्यायला सांगते. आजी तिच्यावर खूप ओरडते, पण तिच्या हातांत पुस्तकें देते. जातांना ती पुटपुटते, " कोण नशिबवान् माणूस तुझा नवरा होणार आहे कोण जाणें ! "

शोभना फणकाऱ्यानें म्हणते," मला मुळीं लग्नच करायचें नाहीं." आणि मग एक छोटें स्वप्न तिला पडतें. कातड्याचें जाकीट घातलेला आणि डोक्यावर खूप रुंद कडेची हॅट्‌ घातलेला तरुण घोड्यावरून दौडत येतो. त्याची कातडी उन्हानें खरपूस शेकलेली, लालसर सावळी असते. त्याच्या हॅटचा पट्टा हनुवटीखालीं अडकलेला असतो. तो घोड्यावरून खालीं उतरतो. ऐटीनें डुलतडुलत पुढें येतो, आणि कमरेच्या पट्ट्यांत खोवलेलीं दोन पिस्तुलें काढून ठो करून झाडतो. तिच्या वर्गांतलीं सगळीं च्यावट पोरें पळून जातात. ( तीं तिथें कशीं आलीं ? ) मग तो आपल्या रांकट हातांनीं शोभनेला उचलतो. आणि करडा डोंगर चढून शेंदरी आकाशांत दिसेनासा होतो.

आपल्या स्वप्नामुळें शोभना इतकी लाजते—इतकी लाजते ! तिचा चेहरा लाल लाल होतो दोन्ही हातांनीं ती आपलें तोंड झाकते आणि पुन्हा पुन्हा म्हणते, " आम्हीं नाहीं जा ! आम्हीं नाहीं जा ! "

पण अभ्यास असतो ना तो मेला दुष्ट ! ती आपल्या धाकट्या भावाला बोलावते आणि जासुदाचें काम करायची विनंती करते. तो गाल फुगवून आणि मुंडी हलवून जोरांत नकार देतो. मग खूप मोठा वादविवाद होतो. जुन्या देवघेवींची उजळणी होते. केलेल्या उपकारांचें व परतफेडींचें स्मरण करून दिलें जातें. अखेर शोभना धाकट्या भावाला कांहीं तरी मौल्यवान् वस्तू देण्याचें कबूल करते. कामाच्या मानानें तिला मोल नेहमींच जास्त द्यावें लागतें कारण जाग्यावरून उठून स्वतःच काम करायला

ती कधींच तयार नसते. करार झाला कीं चिठ्ठी लिहिण्याचा कार्यक्रम घडतो.

चिठ्ठी लिहिण्याकरितां बाबांच्या टेबलावरील कॅलेंडरच्या तारखांचे कागद तिनें जमवून ठेवले आहेत कधीं कधीं कागद हवा असला तर पुढच्या तारखांचे कागदहि ती फाडते. ह्यांत कांहीं चूक झाली असें तिला वाटत नाहीं काय झालें तारखा थोड्या पुढें गेल्या तर? हिशेब करायचा आणि मागची तारीख लिहायची. ह्यावर वडिलांना कांहींच बोलतां येत नाहीं.

मग शोभना चिठ्ठी लिहिते.

डिअर चचिंचोका,

फुटाणाबाईनीं काय अभ्यास दिलाय? आज काळें पाणी आहे कीं नाहीं? आत्मनेपद म्हणजे काय ग? सारखें मेलें येतें पुस्तकांत. कविता मीं पाठ केली नाहीं. तोंडावर रुमाल धरून सांग.

गळ्याशपथ तुझी,

सिंडरेला

जासूद चिठ्ठी घेऊन जातो. जासुदाला बहुदा वाटेंत सवंगडी भेटतात, त्यामुळे त्याला परतायला वेळ लागतो. तोंपर्यंत पुस्तकावर नक्षीकाम केलें जातें. जासूद येतो तेव्हां शाळेला जायला फार थोडा वेळ राहिलेला असतो. मग घाईघाईनें पलीकडच्या खोलींतल्या बाबांना विचारून इंग्रजी वाक्यें लिहिलीं जातात. शोभना गणितें कधींच सोडवत नाहीं. दादाकडून ती सोडवून घेते. परीक्षेच्या वेळीं शोभनेचे वडील गणिताच्या बाईची तिला शिकवणी ठेवतात. मग बाईच घरीं येऊन रोज उदाहरणें सोडवतात आणि शोभना तें पहाते. परीक्षेच्या वेळीं मुली तिला गणितें सांगतात, नाहींतर पेपर देतात. इतकें करून तिचीं गणितें चुकत नाहींत असें नाहीं. पण ती पास होते खरी.

शाळेची वेळ झाली कीं आजी आणि आई शोभनेला घाई करायला लागत. पण घाई करणें हें मुळीं शोभनेच्या वृत्तींतच नाहीं. आपल्याच तालांत आणि आपल्या लहरींनुसार तिचें संगळें काम चाललेलें असतें. तिच्या केसांची वळण जमावी लागते. इअरिंग्ज, ब्लाउज आणि पातळ यांचे रंग जुळावे लागतात सारें कांहीं जुळावें लागतें. कधीं कधीं वेणी घालतांना तिचा हात दुखायला लागतो. मग आजी येऊन हात चेपते तेव्हां वेणी घालण्याचें काम पुरें होतें. जेवण बहुधा मनासारखें नसतेंच, त्यामुळें ती कमीं जेवते आणि आजीचें व तिचें मोठें भांडण होतें.

ह्या सर्व भानगडींत शाळेंत जायला उशीर होतोच घरची मोटार असून देखील. आपल्या शरीराभोंवतीं दरवळणारा सुगंध घेत, पातळ आणि पुस्तकें सावरीत, डुलत डुलत शोभना शाळेंत प्रवेश करते. ती नेहमीं कांहीं तरी चघळत असते. हातानें कांहींतरी चाचपत असते. तास सुरू होऊन बराच वेळ झाला असला तर ती वर्गांत जातच नाहीं. तास सुरू होऊन थोडाच वेळ झाला असला तर ती शांतपणें वर्गाच्या दाराशीं जाऊन उभी रहाते. बाई तिचें उपहासानें स्वागत करतात. पण तिच्यावर त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं. डुलत डुलत ती शेवटल्या बाकावरच्या आपल्या जागेवर जाऊन बसते. कधीं कधीं चिडून बाई तिला उभें रहायला सांगतात. ती शांतपणें उभी रहाते. मागल्या बाकावर बसत असल्यामुळें भिंतीला टेकून उभें रहातां येते आणि मग पाय दुखत नाहींत. कधीं कधीं मैत्रिणीच्या खांद्यावरहि भार टाकतां येतो. चघळणें आणि चाचपणें अर्थात् चालूंच असतें.

बाई चांगल्या असल्या तर थोड्या वेळानें ती आर्जवी स्वरांत म्हणते, "पाय दुखले, बाई." आणि तिचें बोलणें व वागणें त्यावेळीं इतकें गोड असतें कीं बाई हंसून म्हणतात, "बरें, बस खालीं. कधीं कांहीं तुझ्यांत सुधारणा व्हायची नाहीं."

ती हंसते आणि खालीं बसते. बाई आपल्याविषयीं असें म्हणतात ह्याची तिला कांहींच खंत वाटत नाहीं. स्वतःवर व स्वतःच्या जीवनावर

ती इतकी संतुष्ट आहे कीं. त्यांत कांहीं बदल करावा असें तिला वाटत नाहीं. तिचें कधीं कांहीं चुकणें शक्य आहे असा संस्कार तिच्या मनावर झालेला नाहीं. कांहीं नवीन व निराळें करावें अशी आवश्यकताच तिला भासत नाहीं. ती करील तें नेहमीं चांगलेंच ठरत गेल्यामुळें आणि तिला हवें तें नेहमीं मिळत गेल्यामुळें नीति आणि अनीति, न्याय आणि अन्याय ह्या बाबी तिच्या जीवनांत उद्भवल्याच नव्हत्या.

कविता म्हणायची पाळी आली तरी शोभनेची कधींच धांदल उडत नाहीं. कारण बाईंना दिसत नाहीं अशा प्रकारें पुस्तक उघडें ठेवून त्यांत पहाण्याचें कसब तिला चांगलेंच साधलें आहे. बाई त्या दिशेला यायला लागल्या कीं पुस्तक बंद होऊन अदृश्य देखील होतें.

शिवाय रुमालाआडून मदत होत असतेच. कांहीं मुली अशा असतात कीं मैत्रिणींनें कांहीं सांगितलें तर त्यांना धड ऐकूं येत नाहीं. आणि त्या कांहीं तरी ऐकत आहेत असा भाव त्यांच्या चेहेऱ्यावर दिसतो व मग बाईंना संशय येतो. शोभना कांहीं अशी मुलगी नाहीं. तिला कितीहि हळू बोललें तरी ऐकूं येतें. आणि तिच्या चेहेऱ्यावरून असें दिसतें कीं ती आठवण्याचा प्रयत्न करीत आहे. कविता म्हणून ती खालीं बसली कीं अस्पष्टपणें गालांतल्या गालांत हंसते. तिचें तें हंसणेंच तिच्या मैत्रिणींना पुरेसें बक्षीस होतें.

वर्गांत ती नेहमीं हलक्या आवजांत बोलते किंबहुना नेहमींच ती हलक्या आवाजांत बोलते बाईंना तिचें बोलणें ऐकूं जात नाहीं. मग बाई चिडून तिला मोठ्या आवाजांत बोलायला सांगतात. पण शोभना आपला आवाज कधींच चढवत नाहीं. बाईचें आकांडतांडव सगळें फुकट जातें.

अर्धा तास संपला म्हणजे शोभना आणि तिच्या मैत्रिणी कांहीं तरी खातात. चॉकलेट, सुपारी, भाजलेली डाळ, जिनतानची गोळी असलें त्यांचें नाज़ुक साज़ुक खाणें. बाईंना नेहमीं संशय येतो कीं ह्या मुली कांहीं तरी खात असाव्या पण मुद्देमालासकट त्या कधींच सांपडत नाहींत.

तास संपायची वेळ झाली कीं त्या सगळ्या मैत्रिणी कानांवर हात ठेवून बसतात. कारण घंटेचा कर्कश आवाज त्यांना सहन होत नाहीं. शोभनेला आवाज आणि गडबड खरोखरच सहन होत नाहीं. आणि अगदीं नैसर्गिकपणें ती असें करते. शोभना करते तें सारेंच सुंदर आणि ऐटबाज दिसतें, त्यामुळें मैत्रिणींहि तिच्यासारखेंच करतात. कांहीं मुलींना गडबड आणि आरडाओरड ह्यांची नैसर्गिक आवड आहे. त्यामुळें त्यांना शोभनेचा राग येतो. त्या तिला शिष्ट म्हणतात आणि तिच्या 'नाजुक' पणाची थट्टा करतात. पण शोभनेवर थट्टेचा कांहींच परिणाम होत नाहीं. कारण थट्टा करण्याजोगें आपल्यांत कांहीं असेल असें तिला वाटूंच शकत नाहीं.

सुटी झाली कीं शोभना आणि तिचा कळप बाहेर पडतात. शोभनेच्या सगळ्या मैत्रिणी देखण्या, चपळ आणि हुषार आहेत. तिला फक्त तशाच मुली आवडतात. बाकीच्या सगळ्या मुली शोभनेला असून नसून सारख्याच वाटतात. त्यांच्याशीं ती उद्दामपणानें वागते असें नव्हे, तर त्यांच्याकडे अजाणतांच तिचें दुर्लक्ष होतें.

आपल्या मैत्रिणींच्या कळपाची शोभना राणी आहे. त्यांच्या कपड्यांची तीच निवड करते.त्या नेहमीं तिच्यासारखें बोलण्याचा आणि वागण्याचा प्रयत्न करतात. तिला मदत करण्यांत त्यांना ब्रह्मानंद वाटतो. त्यांचें बोलणें ऐकून शोभना हंसली तर मोठें कर्तृत्व गाजवल्यासारखें त्यांना वाटतें. तिच्या नादानें कांहीं हुषार मुलींनीं अभ्यास करणें सोडून दिलें आहे. लहरीप्रमाणें वागण्याच्या मूर्ख संवयी लावून घेतल्या आहेत आणि इतर मुलींशीं फटकून वागायला त्या शिकल्या आहेत. पण शोभनेच्या हातून तें सहज घडतें तें चालून जाण्यासारखी तिची परिस्थिती आहे. आणि ती करते तें खरेंच तिला शोभतें. बाकीच्या मुलींनीं मात्र आपलें नुकसान करून घेतलें आहे.

शोभनेमुळें ह्या मुलींच्या कळपाला अवास्तव महत्त्व चढलें आहे. हा कळप नेहमीं मागच्या बांकावर बसतो, म्हणून मागच्या बांकावर बसणें फॅशनेबल ठरलें आहे. शाळेच्या अभ्यासेतर कार्यक्रमांत हा कळप मागें

मागें राहतो, आणि कुठल्याहि कार्यक्रमाकडे लक्ष न देतां आपसांतच टिवल्याबावल्या करीत असतो. त्यामुळें असल्या कार्यक्रमांत पुढाकार घेणें हें कमीपणाचें ठरूं लागलें आहे. खरें म्हटलें म्हणजे शोभना बॅडमिंटन व टेबल टेनिस उत्तम खेळते, ती गातेहि बरी. पण ह्या खेळांच्या सामन्यांत ती कधींच भाग घेत नाहीं. इतरांशीं चढाओढ करून आपलें श्रेष्ठत्व सिद्ध करावें असें तिला कधीं वाटतच नाहीं. तिच्या दृष्टीनें तिचें श्रेष्ठत्व स्वयंसिद्धच आहे. बाईनीं जबरदस्तीच केली तर ती गातेहि. पण त्याबद्दल ती औत्सुक्य असें कधींच दाखवत नाहीं.

चळवळ्या व उत्साही मुलींना तिचा खूप राग येतो. अशा मुली बहुधा गरीब असतात आणि रूपानेंहि बऱ्या नसतात. त्यामुळें त्यांना शोभनेचा जास्तच राग येतो. पण त्यांना किती राग आला तरी शोभनेचा मिजास शाळेंत नेहमींच चालते. शोभना आपल्याशीं बोलली, किंवा आपलें बोलणें ऐकून हंसली तर मुलींना कृतकृत्यता वाटते. तिला मदत करायची संधी त्या नेहमीं पहात असतात. आणि शोभनेनें एखादी फॅशन केल्याशिवाय तिच्यावर सर्वमान्यतेचा ठसा कधींच पडत नाहीं.

सुट्टींत शोभनेच्या मैत्रिणींचा कळप कुठेंतरी अलग बसून कांहीं-तरीं नाजुक चवदार खात असतो. शोभनेच्या घरून तिला कांहीं ताजें खायला पाठवतात व थर्मासमधून कॉफी पाठवतात. तिला कॉफी प्यायचा फारच कंटाळा येतो. आणि घरून पाठविलेलें खाणें तिला क्वचित्‌च आवडते. त्यामुळें ती थोडेसेंच खाते आणि मैत्रिणींना खाण्याचा आग्रह करते.

खाऊन झाल्यावर कधीं कधीं शोभनेला खेळायची लहर येते. पण सगळ्या मुलींच्या गलबल्यांत जाऊन आपल्या खेळण्याच्या हक्काकरितां भांडणें तिला मुळींच आवडत नाहीं. त्यापेक्षां न खेळणेंच तिला पत्करतें. कुठलीहि गोष्ट मिळावी म्हणून पुष्कळ लोक धडपडत असतील तर ती गोष्ट आपल्याला नको असेंच ती नेहमीं ठरवतें. आपण धडपड करावी इतकी महत्त्वाची कुठची गोष्ट असूं शकेल असें

तिला वाटतच नाहीं. तिच्या मनांत काय आहे तें समजावून घेण्याकरित आणि तें मनोगत पुरें करण्याकरितां तिच्या आजूबाजूचीं माणसें नेहेमं धडपडत असतात, आणि हा आपला अधिकारच आहे असें तिला वाटतें. कधीं कधीं तिला शाळेंत खेळण्याची संधी मिळते. त्यावेळीं तिच्या साऱ्याच हालचाली मोठ्या डौलदार आणि आकर्षक असतात. शिवाय एरवी विलक्षण धिमेपणानें हालचाली करणारी शोभना बॅडमिंटन कोर्टवर विलक्षण चपळाईनें हालचाली करते. पण ती कितीहि चपळाईनें खेळली तरी धांदल व गोंधळ उडाला आहे असें वाटत नाहीं. तिच्या चेहऱ्यावर नेहेमीं शांत भाव असतो. तिच्या हालचाली अचूक, हिशेबी आणि आकर्षक असतात. खेळ चालू असेतोंपर्यंत ती चपळतेनें धांवत असते. पण फूल पडलें कीं तें तिला जोडीदारणीनें उचलून द्यावें लागतें.

आपलें आणि दुसऱ्याचें असा भेदभाव शोभनेच्या मनांत फारसा नसतो. कारण असें कीं तिला हव्या त्या गोष्टी अनायासें मिळतात. म्हणून तिला कांहीं राखावें अगर सांठवावें असें वाटत नाहीं. तिच्या वृत्तींत एक प्रकारची तृप्तता आली आहे. कुठच्याहि गोष्टीविषयीं तिला आसक्ति वाटूंच शकत नाहीं. आपली एकादी वस्तू दुसऱ्यानें मागितली तर ती ताबडतोब देऊन टाकते, आणि आपले एअरिंग अगर पातळ आपल्या एकाद्या मैत्रिणिला अधिक शोभतें असें वाटलें तर ती त्या वस्तु मैत्रिणीला देऊन टाकते.

शाळा सुटली कीं मोटारीतून शोभना घरीं येते. वाटेंत कधीं तिला घाणेरड्या इमारतींची दाटीवाटी दिसते. कधीं विद्रूप, सडलेल्या अंगाचे भिकारी दिसतात. कधीं रस्त्यांत टाकलेलें अन्न खाणारीं भिकाऱ्यांची पोरें दिसतात. असें कांहीं दिसलें कीं तिच्या अंगावर शहारे येतात. तिला वाटतें कीं मोटार खूप खूप वेगानें चालवावी, म्हणजे आपल्याला असलें कांहीं दिसणार नाहीं.

असें कांहीं पाहून ती घरीं गेली कीं धावत जाऊन आजीला मिठी

कुरवाळून म्हणते, " काय झालें ग बाळ ? मास्तरीण बाई रागावल्या कां ? "

शोभना म्हणते, " नाहीं. मला भीति वाटली ! "

" कसली ? "

" मला नाहीं माहीत. "

मग ती आजीच्या सुरकतलेल्या चेहेऱ्याकडे आणि शरीराकडे पहाते. ती आजीला विचारते, " आजी, तुझ्या अंगावर कशा ग अशा सुरकुत्या पडल्या ? "

" म्हातारी झालें ग बाई मी."

" मी सुद्धां म्हातारी होईन काय ? मलासुद्धां सुरकत्या पडतील का अशा ? "

" अग, हें का कोणाला चुकलें आहे ? "

मग शोभनेला भीति वाटते. ती आजीला म्हणते, " मीं मुळींच नाहीं म्हातारी होणार. मी कधीं नाहीं म्हातारी होणार ! " आणि ती पळत पळत बाहेर जाते...मोत्याशीं खूप मारामारी करते.

संध्याकाळीं तिला गाणें शिकवायला मास्तर येतात. शोभनेला गाणें आवडतें. पण लोकांनीं म्हटलेलें. स्वतः गायचा तिला कंटाळा येतो. त्यामुळें ती मास्तरांशीं इतर गोष्टी करून अगर त्यांना प्रश्न विचारून बराचसा वेळ काढते. मग ती मास्तरांना गायला लावते. तिला उग्र गंभीर अगर उदासवाणे स्वर आवडत नाहींत. नाचरे, गुलगुलीत अगर मनाला गुंगी आणणारे स्वर तिला आवडतात. तिचें मन तसें फार संवेदनाक्षम आहे. त्यामुळें संगीताचा तिच्या मनावर चटकन् उत्कट परिणाम होतो. पण आपलें मन क्षुब्ध झालें, भावनाकुल झालें कीं तिला भीति वाटायला लागते. कसला तरी आधार नाहींसा झाल्यासारखें वाटतें. आत्मसंतुष्टता, धिमेपणा हा तर तिच्या जीवनाचा मध्यबिंदू. त्याच्याभोंवतींच अनुभवाचें रेशमी जाळें विणलें जातें. त्या कोशांत शोभना गुरफटून बसते. आणि

आपण सुखदुःखांतून मुक्त झालों अशी तिची कल्पना होते. पण भावना क्षुब्ध झाल्या कीं तिच्या मनाची ही बैठकच कोलमडून पडते. म्हणून ती भावना क्षुब्ध करणारें संगीत टाळतें. एखादी गोड, स्वररचना अगर चाल तिला आवडली तर मात्र थोडीशी मेहनत करून शोभना ती कंठगत करते आणि स्वतःशींच गुणगुणते. मास्तरांच्या समाधानाकरितां त्यांना म्हणून पण दाखविते. तिनें आपल्या रेशमी आवाजांत म्हटलें म्हणजे सारेंच मधुर वाटतें.

मास्तर जातात तेव्हां काळोख पडूं लागलेला असतो. शोभनेला काळोखाची फार भीति वाटते म्हणून ती भराभर घरांतले सगळे दिवे लावते. आपल्या बागेंत देखील दिवे असावेत असा तिचा हट्ट आहे आणि तिचे वडील तो पुरवतीलहि. रात्रीं सगळीकडे विजेचे दिवे लावून ठेवावें आणि जगाच्या कानाकोपऱ्यांतहि अंधाराला जागा राहूं नये असें ती म्हणते. घरांतील माणसें तिच्या या सोशिकपणाचें कौतुक करतात.

रात्रीं कधीं तिला उडतें झुरळ दिसतें. तें पाहिलें कीं तिच्या अंगावर नुसते शहारे उठतात. भीतीनें तिचा थरकांप होतो. त्याचें कांटेरी पाय आपल्याला ओरबडत आहेत असें तिला वाटतें. ती पदर डोक्यावर घेते आणि मोठमोठ्यानें किंचाळते, “ त्याला कोणी तरी मारा, कोणी-तरी मारा ! ” मग कोणीतरी येऊन झुरळाला मारतें.

एरवीं शांत, मृदुभाषिणी असलेली शोभना अशा वेळीं मात्र संतापते. नोकरांना घर स्वच्छ न ठेवल्याबद्दल अद्वातद्वा बोलते. पण तिला सगळेंच शोभून दिसतें. तिनें कांहीं केलें तरी त्याचें कौतुकच होतें.

रात्रीं शोभना लवकर झोपते. ती झोपण्यापूर्वीं आजी स्वतःच्या सुरकुतलेल्या हातानें तिच्या बिछान्यावरच्या सुरकुत्या झाडून टाकते शोभनेच्या खोलींत रात्रभर निळा दिवा असतो. एकटें झोंपायची तिला भीति वाटते. म्हणून आजी तिच्याजवळ बसते आणि तिला थोपटते. शोभनेला नेहेमीं चटकन झोंप लागते. पण कधीं कधीं तिचे डोळे बराच

वेळ उघडे राहतात. मग आजी विचारते,

" कां ग ? झोप कां नाहीं येत आज ? "

शोभना गंभीरपणानें सांगते, " मी विचार करतें आहे! "

तिच्या मनांत कसले तरी विचार येत रहातात. तिला वाटतें, आपण वर्तमानपत्रांत वाचलें तसें आपल्या तोंडावर ॲसिड फेकलें तर काय होईल ? आपण म्हातारे झालों आणि आपलें काळें कुरळे केस पिकले आणि गळून पडले तर ? आपल्या घरांत चोर शिरले तर ? आपल्याला कोणी चाबकानीं मारलें तर ? आणि आपला कोणी गळा आवळला तर ?...

शोभनेला फार भीति वाटायला लागते. मग ती आजीला म्हणते, "आजी, मला गोष्ट सांग." आजी तिला राजपुत्राची आणि राजकन्येची अद्‌भुत कथा सांगते .अद्‌भुततेंत भीति, दुःख वगैरे सारें विरघळून जातें. शोभना पराक्रमी राजपुत्राची राणी होती. सोन्याच्या राजवाड्यांत रहाते. त्या राजवाड्यांत नेहमीं हिऱ्यामाणकांचा प्रकाश पडलेला असतो. आणि आजी पांढऱ्या केसांची म्हातारी परी होऊन आपल्या जादूच्या कांडीनें शोभनेचें साऱ्या संकटांपासून संरक्षण करते.

झोंपेची गुंगी अंगावर पसरते. पापण्यांचे केस गालांवर नाजुकपणें टेकतात. किंचित् घाम येतो. श्वास मंद होतो. शोभाराणीला–त्या मखमली अनुभवांच्या पेटींतल्या हिरकणीला–झोंप लागते.

आणि किलकिल्या पडद्यांतून शोभाराणीकडे पाहून चंदाराणी बर्फासारखें हंसते.

• • •